पूज्य श्री सिद्धेश्वर महास्वामीजींची

प्रवचने

# आनंदयोग



• कन्नड संपादन •
डॉ. श्रद्धानंद स्वामीजी

• भावानुवादक •
प्रा. श्रीकांत अरळी

ज्ञानयोग फौंडेशन, विजापूर

परमपूज्य श्री. सिध्देश्वर स्वामीजी
ज्ञानयोगाश्रम विजापुर यांची प्रवचने.

# आनंदयोग

● संपादक ●
डॉ. श्रध्दानंद स्वामीजी
गुरूदेवाश्रम, कागवाड

● भावानुवादक ●
प्रा. श्रीकांत अरळी,
संकेश्वर

* ज्ञानयोग फौंडेशन, विजापुर *

ANAND YOGA :- Spiritual discourses by Shri.Siddheshwar Swamiji, Shri. Dnyan Yogashram Bijapur. Epotimised and edited by Dr.Shraddhanand Swamiji Gurudevashram, Kagwad. Translated by Prin.Shrikant G. Arali (Rtd.), Sankeshwar.



First Edition. April 2001
Copies 2000



Price Rs.50.00

Publisher :
**Dnyanyoga Foundation**
Bijapur - 3
Phone - 08352 - 61629

Printer :
S.S. Khot.
Shivshakti Offset Printers
Ichalkaranji.. Ph.439739

Cover photograph by courtsey of Dr.Toshniwal.

# प्रस्तावना

आनंद हा शब्दच आनंद दायक ! आनंदाचा योग झाला तर काय सांगावे? सर्व जीवराशींची साधना व सिध्दि आनंदच ! आनंदच आत्मा-परमात्मा यांचे स्वरूप !

श्री गुरूदेव, ज्ञानयोगी, परमपूज्य श्री. सिध्देश्वर महास्वामीजी ज्ञान-योगाश्रम विजापूर यांनी जानेवारी १९९९ ला अथणी येथे एक महिनाभर अध्यात्म प्रवचनें केली. त्या प्रवचानांचा सार संग्रह हा ग्रंथ !

श्री नी म्हैसूर येथे केलेले प्रवचन भगवच्चिंतन, शंभुलिंग श्री. क्षेत्र चिलकवाडी येथे केलेले प्रवचन मी कोण आहे?, श्री क्षेत्र सुत्तूर येथे केलेले प्रवचन भक्तियोग अथणी येथे श्रीमद्‌भगवग्दीतेच्या १६ व्या अध्यायावर केलेले प्रवचन गुणसंपदा ग्रंथ रूपाने प्रकाशित झालेली आहेत. त्यापैकीं भगवच्चिंतन, मी कोण आहे, भक्तियोग व आनंदयोग मराठी भाषेंत प्रकाशित झाली आहेत.

पूज्य श्री. सिध्देश्वर स्वामीजींच्या मार्गदर्शनांतच या सर्व ग्रंथांचे संपादन झालेले आहे. परमपूज्य श्री. गुरूदेवांच्या अमृत मधुर प्रवचनांचे शब्दांकन करून त्या प्रवचनांच्या श्रवणाचा आनंद या ग्रंथाच्या पठणांत लाभावा या साठीं आमच्या परीने होतील तेवढे प्रयत्न आम्ही केले आहेत. वाचकांना या ग्रंथांत कांही दोष आढळून आले, तर त्यांनी आमच्या निदर्शनास आणून देण्याची कृपा करावी.

या ग्रंथाच्या रचनेत आणि प्रकाशनांत प्रत्यक्षपणे व अप्रत्यक्षपणे सहाय केलेल्या सर्वांना अनंत प्रणाम ! सहृदयी वाचकांचे या 'आनंद सदनीं' आत्मीय स्वागत !

डॉ. श्रध्दानंद स्वामीजी,
श्री. गुरूदेवाश्रम, कागवाड.

# अनुवादकाचे दोन शब्द

परमपूज्य श्री. सिध्देश्वर महास्वामीजी, ज्ञानयोगाश्रम, विजापूर आजच्या काळांतील एक थोर विचारवंत, आत्मसाक्षात्कारी, ज्ञानी संत. गेली तीस-चाळीस वर्षे 'श्री' कर्नाटक व महाराष्ट्रांत सर्वत्र संचार करीत आध्यात्म ज्ञानाचा मंगलमय प्रकाश पसरवीत आहेत.

'श्री' नी ठिकठिकाणीं जी प्रवचने केली त्यांचे ग्रंथात रूपांतर झाले. मराठी भाषेंत 'भगवच्चिंतन, मी कोण आहे?, भक्तियोग, आनंद योग या ग्रंथाचा अनुवाद करण्याचे भाग्य मला लाभले.

परमपूज्य श्री.सिध्देश्वर स्वामीजीनी वेद, आगम, उपनिषदें, योगसूत्र, भगवद्गीता, वचनशास्त्र आदि भारतीय व पाश्चात्य दर्शनांचा सखोल अभ्यास करून एक वेगळाच सिध्दांत मांडला आहे. 'प्रायोगिक अध्यात्म ' हा नवा सिध्दांत !

अध्यात्म विद्या व जीवन यांची सांगड घालून या जीवनांतच शाश्वत सुख, परमानंद प्राप्त करून घेतां येतो; हे श्री' नी अत्यंत सोप्या भाषेंत सांगितले आहे.

श्रीं' च्या अमृतमय मधुर प्रवचनांचे मराठी भाषेत रूपांतर करणें सोपे काम नव्हे. कन्नड भाषेंत अध्यात्मांत प्रचलित शब्दांना मराठी भाषेत प्रतिशब्द सांपडणें फारच कठिण. कन्नड भाषेंत बयलु या शब्दाची व्याप्ति फार मोठी आहे. बयलु शब्दाचा सामान्य अर्थ मोकळे मैदान. पण अध्यात्मिक भाषेंत बयलु शब्दाचा अर्थ आहे...आकाश...पोकळी...शून्य...महाशून्य...परमात्मा.

घन या कन्नड भाषेतील शब्दाचा अर्थ...पूर्ण...सर्व व्यापी...परमात्मा !

अध्यात्मातील खोल आणि गहन आशय व्यक्त करतांना शब्दांचे सामर्थ्य तोकडे पडते. या शब्दांचा अर्थ जाणून या ग्रंथातील अध्यात्माचा आनंद मिळवायचा असेल तर एकदां पुस्तक वाचून तो आनंद मिळत नाहीं. पुन: पुन: हे ग्रंथ वाचून त्यांचे मनन-चिंतन केल्याने हा आनंद लाभेल.

जीवनांतील कडू-गोड अनुभव पचवून सदा आनंद सागरांत समरस होण्याचे सामर्थ्य वाचाकांना लाभो ! हीच भगवंताच्या चरणीं प्रार्थना !

प्रा. श्रीकांत अरळी
संकेश्वर, मु. फार्म हाऊस कणगला
फो. ०८३३३-७९२८९

# भक्तिसेवा

श्रीमति राधाबाई किसनलाल तोष्निवाल यांनी आपले स्वर्गीय पति श्री.किसनलाल मोतिलाल तोष्निवाल यांच्या स्मरणार्थ या ग्रंथाच्या मुद्रणासाठीं धन देऊन ही पवित्र भक्तिसेवा ईश्वर चरणीं अर्पण केली आहे.

स्व. श्री. किसनलाल मोतिलाल तोष्निवाल हे विजापुरचे कापसाचे गण्य व्यापारी होते. परमपूज्य लिंगैक्य श्री मल्लिकार्जुन शिवयोगीश्वरांचे ते परम भक्त. गेल्या चाळीस वर्षापासून त्यांनी श्रीं च्या उपदेशामृताचे सेवन करून त्यांना हृदयत: आपले सद्‌गुरू मानले. ज्ञानयोगाश्रमाशी सेठजींचा फारच घनिष्ट संबंध ! दररोज सद्‌गुरूंचे दर्शन घेऊनच त्यांची दिनचर्या आरंभ होई. परम पूज्य गुरूदेव श्री. मल्लिकार्जुन स्वामीजींनी व श्रींचे परम शिष्य परमपूज्य श्री सिध्देश्वर स्वामीजींनीं आपल्या जीवनांत खडतर वैराग्य स्वीकारलेले. ''कोणाकडे कांहींही मागायचे नाही.'' हा त्यांचा बाणा ! दररोज आश्रमाला श्रीं च्या दर्शनासाठीं येणारे भक्त, साधक यांच्यासाठीं नित्य अन्नदासोह चालतो. त्या दासोहाला कधीही धनाची कमतरता भासूं नये; या उद्देशाने श्री. किसनलाल यांनी शाश्वत निधी उपलब्ध करून दिला.

श्री. किसनलाल खऱ्या अर्थाने गुरूभक्त. सद्‌गुरू लिंगैक्य झाल्यानंतर थोड्याच दिवसांत (१९८५) ते कैलास वासी झाले. श्रीमति राधाबाई यांनी पतींच्या इच्छेप्रमाणें या ग्रंथाच्या प्रकाशनासाठीं धन अर्पण केले. त्यांना श्री. नंदलाल, श्री. सुभाष, श्री. अशोक, श्री. राजेंद्र असे चार सुपुत्र व चार सुपुत्री. आपल्या स्वर्गीय पित्याप्रमाणेंच सर्वजण धर्म पथांत अग्रेसर आहेत. आनंद योग पुस्तकाच्या प्रकाशनाद्वारे ज्ञान दासोहांत सर्वांचा सहकार. श्रीमति राधाबाई, त्यांचे पुत्र, पुत्रि, पौत्र, बंधु-बांधव सर्वांना गुरूदेवांचे शुभ आशिर्वाद सतत लाभोत. अन्न-दासोह व ज्ञान-दासोह करून समाजाचे कल्याण चिंतणाऱ्या तोष्निवाल कुटुंबाला सकल संपत्ति, आत्मशांति-समाधान, आयुरारोग्य लाभो ही श्री चरणीं प्रार्थना.

# अनुक्रमणिका

## ज्ञानयोग फाउंडेशनची प्रकाशनें

कन्नड

| | |
|---|---|
| १) पांतजल योगदर्शन | ३५.०० |
| २) योग प्रवेश | २.०० |
| ३) परमानुभव बोधे (चतुर्थ संधि) ✻ | |
| ४) परमार्थ गीता ✻ | |
| ५) सांकेतिक कथेगळु ✻ | ८.०० |
| ६) श्रीमद्भगवद्गीते | १५०.०० |
| ७) कठोपनिषत् ✻ | ४०.०० |
| ८) श्वेताश्वतरोपनिषद् | ४०.०० |
| ९) केनोपनिषद् | ३०.०० |
| १०) मांडुक्योपनिषद् | ६५.०० |
| ११) सिध्दांत शिखामणि | १२५.०० |
| १२) शांतिपथ | १०.०० |
| १३) सिध्दरामेश्वर वचन प्रवचन | १५.०० |
| १४) समाज संपद हागू | ५.०० |
| इतर प्रबंध गळु | |
| १५) हठयोग ✻ | |
| १६) विश्वद विविध धर्म सुक्तिगळु | ५.०० |
| १७) ईशावास्योपनिषद | २०.०० |
| १८) भगवच्चिंतन | ४०.०० |
| १९) मौनलोकद हाडुगळु | ५०.०० |
| २०) गीता माधुर्य ✻ | २५.०० |
| २१) देवपूजा | ५.०० |
| २२) गुरूदेव | ४०.०० |
| २३) श्रीमद्भगवद्गीता चंद्रिके (अध्याय २) ✻ | |
| २४) पूज्य मल्लिकार्जुन श्रीगळ अनुभावामृत | ४०.०० |
| २५) चिंतनेगागि कथेगळु | १५.०० |
| २६) साधना पथं | १५.०० |
| २७) नानारू | ६०.०० |
| २८) भक्तियोग | ५०.०० |
| २९) आनंदयोग | ५०.०० |

| | |
|---|---|
| ३०) गुण संपदा | ५०.०० |
| **मराठी** | |
| १) परमार्थ गीता ❊ | |
| २) परमानुभव बोध ❊ | |
| ३ ) सिध्दांत शिखामणि ❊ | |
| ४) कर्मयोगि जीवन ❊ | |
| ५) भगवच्चिंतन | ५०.०० |
| ६) भक्तियोग | ५०.०० |
| ७) मी कोण आहे? | ५०.०० |
| ८) आनंद योग | ५०.०० |
| **English** | |
| 1) GOD WORLD & SOUL | 50.00 |
| 2) Devotional Sayings of Basaveshwara | 20.00 |
| 3) Songs of silence | 50.00 |
| 4) Nijguna's Exposition of spiritual wisdom | 40.00 |
| 5) Selected Vachanas of Siddharameshwar | 25.00 |

(❊ प्रति संपल्या आहेत)

## कॅसेट

भगवद्गीता, उपनिषद, वचनशास्त्र इत्यादि विषयांवरील लिंगैक्य परमपूज्य श्री मल्लिकार्जुन महास्वामीजी व परमपूज्य श्री सिध्देश्वर स्वामीजी यांच्या प्रवचनांचे ध्वनिमुद्रित कॅसेट्स उपलब्ध आहेत.

पुस्तके मिळण्याचे ठिकाण

१) ज्ञान योगाश्रम विजापूर ५८६१०३ फो.६१६२९
२) श्री. गुरूदेवाश्रम कागवाड ता. अथणी. जि. बेळगांव फो.६४६५४
३) श्री. शिवयोगमठ एक्संबा ता. चिकोडी जि. बेळगांव फो.५६४७६
४) श्री. गुरूदेवाश्रम, उगारखुर्द ता. अथणी जि. बेळगांव फो.७२९९७

# १ भूक अंतरंगाची

या भूमंडली मानव लाखो वर्षांपासून नांदतो आहे. तेव्हांपासून आतापर्यंत त्याला भूक लागतेच आहे.ही भूक दोन प्रकारची १) अंतरंगाची भूक व २) बहिरंगाची भूक. या भुके मुळेंच मानवाचे जीवन सुखमय झाले आहे. सुंदर...हिरवेगार झाले आहे. जीवन जगण्याची तीव्र उत्कंठा या भुकेमुळेच आहे.

अंतरंगाची भूक-आत्म्याची भूक भागविणे सोपे नाही. बहिरंगाची भूक अथवा दैहिक भूक भागविणे सोपे. बहिरंगाची भूक भागली तर तृप्ति लाभते संतोष होतो. अंतरंगाची भूक भागली तर परम संतोष!

रणरणत्या उन्हांतून पायी चालत आलेल्या माणसाला खूप तहान-भूक लागते. त्याला थंडगार सावली...अन्न...पाणी लाभले की त्याला केवढा संतोष होतो! तो संतोष पैशांत मोजतां येत नाही.

मूल दिवसभर खेळून, दमून, भागून घरी येते. माता त्याला दूध भात भरविते. दूध पाजते. पाठीवर थोपटते. पोटभर जेवून मूल गाढ झोपी जाते. स्वर्गसुखाचा आनंद उपभोगते. अशी शांत झोप येत नसेल तर आपण मिळविलेली अगणित संपत्ति काय कामाची? जीवनांत कोणत्या बाबीला किती महत्व द्यायचे ते माणसाला समजले नाही. सुखाची आशा धरून विषयांच्या पाठीमागून धावत सुटतो. या जगांतील विषयसमूह म्हणजे मृगजळ ! त्या मृगजळापाठीमागे धावून सुख रूपी जळ लाभत नाही. तृष्णा शमत नाही. सुख-संतोष लाभत नाही. हाच संसार !

माणसाने या जगांत बालकाप्रमाणे सहजपणे जगायला शिकले पाहिजे. दिवसभर काम करून भूक लागल्यावर आपल्या बंधु-बांधवा समवेत जेवून खाऊन आनंदाने हंसून-खेळून तृप्त व्हावे. काम करून दमल्यानंतर सर्व कांही विसरून गाढ निद्रा सुख अनुभवावे. निसर्गाने जीवनाला दिलेली ही अद्‌भूत देणगी. या देणगीचा आनंद माणसाने अवश्य घ्यावा.

निद्रासुख हे गरीबांपासून श्रीमंतांना सर्वांना समान असते. मऊ-मऊ उबदार हंस पक्षांच्या पंखांनी बनविलेल्या सुखासनांत लोळणाऱ्या राजाला लाभते तेच निद्रा सुख...दिवसभर उन्हांतान्हातून राबून संध्याकाळी मातीच्या ढेकळावर झोपणाऱ्या गरीब शेतकऱ्याला ही तेच निद्रा सुख ! दिवसभर राबल्या नंतर थकल्या भागल्या गरीबाला जमीन मिळाली तरी पुरे ! लगेच त्याला गाढ झोप येते. संगमरवरी दगडांनी बनविलेल्या हवानियंत्रित राजमहालांत झोपणाऱ्या श्रीमंताला मात्र झोपच्या गोळ्या खाल्याशिवाय झोप येत नाही. नैसर्गिक रीतीने जगून सहज संतोष मिळविण्याची कला शिकवते आध्यात्म ! येथे प्रत्यक्ष दिसणाऱ्या जगांत संतोषाने जगतां येत नसेल तर न दिसणाऱ्या त्या दूरच्या स्वर्गात आपणांस सुख लाभेल काय? अंग मोडून मेहनत करणाऱ्या माणसाला तहान-भूक-निद्रा सहजपणे लाभते. जीवनांत जेवढे लाभते, तेवढयावरच तहान-भूक भागवून तो सदा संतृप्त असतो. बहिरंगाची भूक भागल्यानंतर लाभणारी ही सहज संतृप्ति ! सहज आनंद!

या जगांत काय आहे? जगाच्या पलिकडे काय आहे? या देहाच्या आंत-बाहेर काय आहे? जनन-मरण कां आहे? सुख-दु:खाचे मूळ कशांत आहे? या प्रश्नांची उत्तरे शोधणे हीच अंतरंगाची भूक ! सत्य शोधनाची आस ! ही आस तृप्त झाली की नित्य तृप्ति ! सदा संतोष !

आपणांस सुंदर फूल लाभले की संतोष होतो. ते कोमेजले तर असंतोष होतो. या जगांत आपणांस कोणती तरी चांगली वस्तु लाभली

तर संतोष होतो. सुख होते. ती वस्तु नाश पावली तर दु:ख होते. अविनाशी परम सत्य परमात्म्याला जाणून घेतले तर अविरळ आनंद ! अंतरंगाच्या भुकेचे हे अमृतफळ !

देवाने आपणांस फक्त पोट तेवढेच दिलेले नाही. डोळे, कान, नाक, मन , बुध्दि...सर्व कांही दिलेले आहे. आपण डोळ्यांनी हे विशाल जग पहावे ! कानांनी सृष्टी तील विविध शब्द ऐकावेत. मन बुध्दि यांनी विश्व तथा विश्वातीत सत्याचे चिंतन चालावे. त्या परम सत्याला जाणून घेऊन त्याचा अनुभव घ्यावा ! अंतरंगाच्या भुकेची ही विविध रूपे ! ही अलौकिक भूकच जगाच्या सर्व प्रकारच्या ज्ञानाचे मूळ सूत्र होय !

अंतरंगाची ही भूक कांही आजची-कालची नव्हे. मनुकुलाच्या आरंभापासून ही भूक वाढत आली आहे.

''ही भूमि...हे आकाश केवढे विशाल आहे. या सुंदर सृष्टीची निर्मिति करणारी शक्ति कोणती? या शक्तीचा उद्देश काय?''

अशाप्रकारे मानव प्रप्रथम चिंतन करू लागला. हाच सत्याचा शोध ! या सत्यशोधनासाठी त्याने आपल्या वैयक्तिक सुखांचा त्याग केला. अनवरत संशोधनांत तो मग्न झाला. त्यातूनच कपिल, कणाद, आर्यभट, भास्कराचार्य, चरक सुश्रुत, न्यूटन-गॅलिलिओ सारखे वैज्ञानिक उत्पन्न झाले.

या परम सत्याच्या शोधासाठीच बुध्दाने सति-सुत, राज्य, राजमहाल यांचा त्याग केला. महावीराने आपले बंधु-बांधव, राज्य, वैभव यांना दूर सारले. तनु-मन यांवरील मोह त्याने दूर केला. आत्म्यावरील आशा-कर्म यांचे कण झाडून तो परिशुध्द झाला. त्यांना परम दर्शन लाभले. असे संत-महात्मे या विश्वांत सगळीकडे आहेत. सर्व देशांत पाऊस पडतो..पिके येतात. नद्या-नाले वाहतात. सूर्य-चंद्र प्रकाशतात. विश्वभर सत्यदर्शी सुध्दा असतात. त्या सर्वांची साधना, त्यांचा उपदेश एकच ! आपणांस जवळ वाटतात संत-शरण. थोडेसे दूर

सॉक्रेटिस, अरिस्टॉटल, येसू, झरतुष्ट्र वगैरे महात्मे ! त्या सर्वांनी एकाच सत्याचे प्रतिपादन केले.

त्या परम सत्याचे दर्शन घडावे ही तळमळ साधकाच्या ठिकाणी तीव्र व्हावी. त्यामुळे सत्यदर्शन सहजपणे घडते. कांही ज़णांना धूम्रपान करण्याची तीव्र इच्छा होते. त्यासाठी ते खूप प्रयत्न करतात. सत्य दर्शनाची तळमळ तेवढी तीव्र व्हायला हवी. तेंव्हा साधक बोधकाच्या ठिकाणी भेदभाव बाळगत नाही. सर्व गुरूजनांकडून सर्व ग्रंथामधून तो ज्ञानामृत मिळविण्याचा प्रयत्न करतो. बाळाला भूक लागली की माता दूध पाजते. श्रीमंत लोक सोन्या चांदीच्या वाटीतून दूध पाजतात. गरीब मातीचे पात्र अथवा शिंप घेऊन त्याने बाळाला दूध पाजतात. पात्र वेगवेगळे असले तरी दूध एकच असते ना? बोध करणारा धर्मगुरू-ग्रंथ वेगवेगळे असले तरी ज्ञानरूपी दूध एकच !

नेरे केन्नेगे तेरेगल्लके शरीर गूडुवोगद मुन्न
हल्लु होगि बेन्नु बागि अन्यरिगे हंगागद मुन्न
कालमेले कैय्यनूरि कोलु हिडियद मुन्न
पूजिसु कूडल संगम देवन !
(गालांवर सुरकुत्या पडण्यापूर्वी, शरीर झुकण्यापूर्वी
दांत जाऊन पाठ वांकून, दुसऱ्यावर अवलंबिण्यापूर्वी
पायावर हात टेकून काठी हाती धरण्यापूर्वी
म्हातारपणामुळे शरीर कुरूप होण्यापूर्वी, मरण येण्यापूर्वी,
पूजा कर कूलसंगम देवाची)

मनुष्य कितीही सदृढ असला तरी त्याला म्हातारपण आणि मरण चुकलेले नाही. त्यांनी आपला ग्रास घेण्यापूर्वीच आपण गुरू-देव, संत-महंत यांचा उपदेश रूपी अमृत पान करावे. त्याने आपले सत्यशोधन-साधन सुगम होते. अंतरंगाची भूक शमली की परमतृप्ति-परमानंद प्राप्ति ! हाच आनंद योग होय !



# २ सत्यासक्ति

माणसाला शेकडो इच्छा ! त्या इच्छा पूर्ण झाल्या तर त्याला तृप्ति ! तहान-भूक या त्याच्या बहिरंगाच्या इच्छा. शांति-समाधान या अंतरंगाच्या इच्छा. बहिरंगाच्या इच्छा पूर्ण झाल्या की तृप्ति ! अंतरंगाच्या इच्छा पूर्ण झाल्या तर परम तृप्ति ! बहिरंग जीवनाच्या समृध्दीने भौतिक इच्छा प्रशांत होतात. अंतरंगाच्या आध्यात्मिक जीवनाच्या समृध्दीने अभौतिक इच्छा प्रशांत होतात. आपण शांति-प्रशांति, तृप्ति-परम तृप्ति दोन्ही मिळवाव्यात.

दैहिक दृष्टीने मनुष्य सशक्त, सुदृढ व निरोगी असावा. हे बहिरंग समृध्दीचे लक्षण होय ! तेव्हा रसानुभवाने जिभेला तृप्ति ! शब्दानुभवाने कानांना तृप्ति ! रूपानुभवाने डोळ्यांना तृप्ति ! निसर्गाने आपणाला डोळे, कान, नाक इत्यादि ज्ञानेद्रिये दिली. रूप-शब्द-स्पर्श-रस इत्यादि विषय ही दिले आहेत.

आकाशात स्वच्छंद विहार करणारे पक्षी, तरंगणारे मेघ, प्रकाश देणारे सूर्य-चंद्र इत्यादि जगाची संपत्ति, वस्तु संचय पाहून मनुष्याने संतोष मानावा. पण त्या सर्व वस्तु आपल्या आधीन असाव्या अशी आशा धरू नये. तेंव्हा जीवनांत तृप्ति लाभते. अंतरंगातील आध्यात्मिक भूक शमन झाल्यावर जीवनांत परम तृप्ति लाभते. तेंव्हा आपल्यापाशी धन-संपति असली अथवा नसली तरी आपण सदा संतुष्ट असतो. ही परमतृप्ति ! परमानंद ! ज्ञानाने हा परमानंद लाभतो.

हे एक फूल आहे. फुलासमवेत काटाही आहे. आपणांस फुलाचे

ज्ञान असावे. काट्याचे ज्ञान ही असावे. तेव्हाच आपण त्या कांट्यापासून कांहीच इजा न होता; ते सुंदर फूल मिळवू शकतो. या प्रपंच रूपी फुलझाडामध्ये पारमार्थिक परमानंदाचे सुंदर गुलाबी फूल उमलते. आपणांस प्रपंच आणि परमार्थ या दोहोंचे ही ज्ञान असणे आवश्यक. एक असून दुसरे नसले तर डोकेनसलेले पाय अथवा पाय नसलेले डोके असल्याप्रमाणे !

प्रापंचिक समस्या सोडविण्यासाठी आपणांस प्रापंचिक ज्ञान आवश्यक. तसेच पारमार्थिक समस्या सोडविण्यासाठी पारमार्थिक ज्ञान आवश्यक.

सर्वज्ञानुक्त: यदि भवति मनुष्य: ।
तदा स: भवति सुखि आनंदवान् ॥

मानवाने प्रपंच आणि परमार्थ दोहोंचे ज्ञान मिळवावे. त्यामुळे जीवनांत परिपूर्ण शांति समाधान लाभते. हाच आनंदयोग ! हा आनंदयोग प्राप्त करून घेण्यासाठी आपण ज्ञानामध्ये आसक्ति ठेवावी. आसक्ति असेल तर जीवन रसपूर्ण आनंददायी होते. आसक्तिमुळेच इष्टार्थ सिध्दी. भौतशास्त्र असो, रसायन शास्त्र असो, पाकशास्त्र असो. कोणतीही विद्या आसक्तीमुळेच लाभते. त्याचप्रमाणे तत्वशास्त्र अथवा आध्यात्म विद्येमध्येसुध्दा आपणांस दृढ आसक्ति असली पाहिजे. त्याने सत्यदर्शन होते. सदानंद लाभतो. ही आसक्ति ज्ञानसहित असावी. नाहीतर अन्यासक्तीमळे सत्याचा विसर पडण्याचा संभव अधिक !

एक तरूण गृहस्थ बौध्द संन्यासी झाला. घरदार, सति-सुत यांचा त्याग करून निघाला. पत्नीने एक सुंदर फूल पतीच्या हाती दिले. ती म्हणाली, ''आतां आपण निर्वाण पथिक. तथागत ! माझे अंतिम भावार्पण या फुलाच्या रूपाने आपण स्वीकारावे''

तरूण संन्याशाने त्या फुलाचा स्वीकार केला. तो दूर-दूर निघून गेला. बौध्द संघामध्ये त्याने वीस वर्षे घालविली.

एके दिवशी एका साधकाने तसलेच एक फूल त्या संन्याशाला अर्पण केले. ते फूल पहातांच त्या संन्याशाला वीस वर्षापूर्वी घर सोडतांना पत्नीने दिलेले ते फूल आठवले. त्या फुलाबरोबरच फूल देणारे ते हात...मुख...भाव सर्व कांही नजरेसमोर आले. त्याची बुध्दि मंद झाली. निर्वाण पंथातून त्याचे मन क्षणभर विचलित झाले. दुसऱ्या क्षणी बुध्दाची मूर्ति नजरेसमोर आली.

''तूं फक्त आज तुला मिळालेले फूल आणि तो देणारा माणूस यांनाच पहावे. त्या दिवसाच्या फुलाला नव्हे !''

जणू बुध्द मूर्तिने त्याला सांगितल्याचा भास झाला. संन्याशी पुन: जागृत झाला. सत्यासक्ति दृढ झाली. निर्वाण पंथामध्ये तो अग्रसर झाला.

सत्याशिवाय अन्य कशाचीही भिन्न आसक्ति नसेल तरच त्या साधकाला मात्र सत्यदर्शन घडते. सदा आनंद ! नाहीतर त्याला हा आनंद लाभत नाही. अन्यासक्तीमुळे केवढे अनर्थ घडतात याची उदाहरणे खूपच आहेत.

राजा भर्तृहरि श्रेष्ठ कवि, ज्ञानि, अनुभवि, संत. तो शूर-वीर, सशक्त, स्फुरद्रुपी होता. त्याची पत्नीसुध्दा तितकीच सुंदर.. रूपवती ! संपत्ति, वैभव यांची कमतरता नव्हती.

एकदा राजा वन विहारासाठी अरण्यात गेला. उंच उंच डोंगर, घनदाट वृक्ष... सर्वत्र हिरवळ पसरलेली. झुळुझुळु वाहणारे निर्झर. अरण्य जणु कांही नटून थटून राजाच्या स्वागताला सिध्द झाल्याप्रमाणे भासत होते. प्रशांत वातावरण त्या अरण्यांत एक झोपडी. त्या झोपडीमध्ये एक तपस्वी ध्यानस्थ बसला होता.

राजाने नम्रपणे भक्तिभावाने त्या ऋषीला वंदन केले.

राजाची नम्रता, विनय, भक्तिभाव पाहून ऋषी संतुष्ट झाला. त्याने एक दिव्य फळ राजाला दिले.

" या फळाचे सेवन कर. तूं शंभर वर्षे तरूण आणि सुंदर राहशील." राजाने त्या फळाचा स्वीकार केला त्या तपस्व्याला वंदन केले आणि तो राजधानीला परतला. राजाने विचार केला, "मी शंभर वर्षे तरूण होऊन राहिलो तर आपली प्रिय राणी म्हातारी होईल. हे कांही बरोबर नाही. राणी तरूण आणि सुंदर असेल तर आपण म्हातारा झाल्याचे दु:ख नाही"

राजवाड्यांत येतांच राजाने ते फळ राणीला देऊन, त्या फळाचे महत्व सांगितले. राणीने अत्यंत आनंदाने ते फळ घेतले.

दुसऱ्या दिवशी राज दरबारात एक तरूण नर्तकी आली. राजाला वंदन करून तिने एक फळ राजाच्या हाती दिले.

" हे अमृतफळ. या फळाचे सेवन जे करतील त्यानां चिरयौवन प्राप्त होईल. मी जर या फळाचे सेवन केले, तर समाजाला अधिक हानी होईल. आपण ह फळ सेवन केले तर आपण या देशाचे संरक्षण अधिक चांगल्या रीतीने करूं शकाल."

राजा आश्चर्यचकित झाला. "तुझ्या हाती हे फळ कसे आले?" राजाने विचारले.

"आपल्या राजवाड्यातील एक तरूण सेवक माझ्याकडे नेहमी येत असतो. त्याने मला हे फळ दिले."

राजाने त्या सेवकाला बोलावून चौकशी केली. सर्व रहस्य फुटले. अन्यासक्तीने झालेला हा घोर फसवणुकीचा प्रकार पाहून राजा शोक विव्हळ झाला.

यां चिंतयामि सततं मयि सा विरक्ता ।
साचान्यमिच्छति जनं सजनोऽन्यासक्ता ॥
अस्मद कृते परितुष्यति काचिदन्या ।
धिक्तांच तं च मदनं च इमांच मांच ॥

ज्या महाराणीवर सतत प्रेम करीत मी तिचेच स्मरण करतो ती

मजविषयी विरक्त. दुसऱ्यावर ती आसक्त! तो दुसरा सुध्दा अन्य स्त्रीवर आसक्त. ती स्त्री माझ्या कल्याणाची चिंता करते. तिला, त्याला, हिला, कामदेवाला आणि मला पण धि:कार असो!

या घटनेने राजा जागृत झाला. ''तपस्वी ऋषीने हे फळ देऊन माझे डोळे उघडले!'' असे म्हणून राजा राज्यत्याग करून बैरागी होऊन, परम सत्याचा शोध घेण्यासाठी निघाला. अन्यासक्तीचा त्याग करून सत्यासक्तीची कांस धरून राजा महान संत झाला.

साधु-संत, शरण सत्पुरूषांत जी सत्यासक्ति असते; देवाला प्राप्त करून घ्यायची जी तळमळ असते; तो भाव आपणांस आदर्श!

अक्कमहादेवी तरूण होती. सुंदर होती. सगळी भौतिक सुखे तिच्यापुढे हात जोडून उभी होती. पण त्या महाशिवशरणीच्या सत्यासक्तीच्या तीव्रतेपुढे बाह्य सौंदर्य, सुख आपले सर्व आकर्षण गमावून बसले होते. केवढी अद्भुत सत्यासक्ति ही!

उदयदलेद्दु निम्म नेनेवेनय्या
कसदेगेदु चळिय कोट्टु
निम्मबरव हारूतिदैनय्या
हसे हंदरनिक्कि
चेन्नमल्लिकार्जुनय्या नीनावाग बंदिहे एंदु!

''मी पहाटे उठतांच तुझे स्मरण करते. केरकचरा काढून सडा संमार्जन करून तुझ्यासाठी आसन मांडते. मांडव घालून सजावट करते. देवा, तू केंव्हा बरे येशील? मी तुझी नित्य वाट पहाते''

अक्कमहादेवीची ही सत्यासक्ति. महाकवि रविद्रनाथ टागोर यांची सत्य-शिव याविषयी आसक्ति तितकीच तीव्र होती.

''हे भगवान, माझ्या जीवनांतील प्रत्येक क्षण मी तुझ्या आगमनाची वाट पाहण्यातच घालवीत आहे.

या तनुरूपी भूमीवर... परिशुध्द मन हेच आसन... रात्रंदिवस मी तुझीच वाट पाहतो आहे...''

रविद्रनाथांच्या काव्याचा हा भाव परम सत्याविषयी गाढ आसक्ति व्यक्त करतो.

आपल्या जीवनांतील अन्यासक्ति कमी होऊन गाढ अशी सत्यासक्ति वाढीला लागली पाहिजे. तरच आपणांस सत्य-देव दर्शन घडेल. सदा आनंद ! आपण कितीही शहाणे असलो तरी आपल्या ठिकाणी तिळमात्रही अन्यासक्ति असेल तर आपणांस देवदर्शन होणार नाही.

एका श्रीमंताने एक रत्नजडित मौल्यवान आंगठी धारण करून देवदर्शनासाठी तो मंदिराला गेला. त्याचे सर्व लक्ष आपल्या बोटांतील मौल्यवान आंगठीकडे होते. त्याला कसे बरे गुरू-देव यांचे दर्शन घडेल? अशा प्रापंचिक अन्यासक्तीचा त्याग केला तरच देवदर्शन ! दिव्यानंद ! हाच आनंदयोग होय.



# ३ सुवर्णक्षण

ही आनंद जिज्ञासा ! जीवन आनंदमय करण्याचे चिंतन. आनंदाचा अनुभव न घेतां परम सत्याविषयी केवळ जाणून घेतले तर आनंद लाभणार नाही. या आनंदाचा अनुभव घ्यायला हवा. ज्ञान आणि अनुभव या मध्ये फरक आहे तो हाच.

सागराला पाहून या सागराचे तरंग ते किती? खोली किती? या सागरात किती प्राणी आहेत? हे जाणून घेणे हेच ज्ञान होय. तोच सागर पाहिल्यानंतर तो आपल्या डोळ्यांत... मनांत भरून रहावा. तो सागर म्हणजेच आपण व आपण म्हणजेच हा सागर असे वाटण्या इतपत आपण त्या सागरांत मग्न व्हावे. हाच सागरानुभव होय. ज्ञान क्षेत्रांत साधक प्रश्न करतो... हे असे कां? काय? कसे? अनुभव क्षेत्रांत तो मौन होऊन राहतो. त्याच सागराला कवि पाहतो. त्या विशाल सागरावर उठणाऱ्या तरंगावर परावर्तित होणारा प्रकाश किरणांचा खेळ पाहून देहभान विसरतो. सागर भावामध्ये तो समरस होतो. तन्मयतेच्या त्या क्षणी कवीच्या हृदयांत आनंदरस उतू जातो. हाच अनुभव होय !

ज्याला अजून चालतां येत नाही, बोलतां येत नाही असा कोवळ्या वयाचा बालक. त्याच्या हाती एक मोगऱ्याचे फूल दिले तर त्या फुलाला पाहतांच मूल त्या फुलाशी समरस होते. मूलच फूल होते. फूलच मूल होते. मुलाच्या मुखावर हास्यरूपी मोगरा फुलतो. डोळ्यात आनंदरस उतू जातो. टाळ्या वाजवून मूल नाचूं लागते. घर सगळे आनंद सागर बनते. हे ज्ञानामुळे घडत नाही. तन्मयतेमुळे या आनंदाचा अविर्भाव.

नाटकामध्ये नटसुध्दा हंसतो. टाळ्या वाजवून नाचतो. कारण तेथे ''हसावे, नाचावे'' असे नाटकांत लिहिलेले असते. नटाचे हसणे, नाचणे वरवरचे असते.

माणसाने जीवनांत कोणतेही काम केले तरी तन्मयतेने अनुभव घेत काम करावे. तेंव्हा जीवन आनंदमय होते.

झुळु झुळु वाहणारे ओढे-नाले, पावसाची रिम-झिम, फलवती भूमि, मंद वाहणारा वारा, प्रकाश देणारे, सूर्य-चंद्र.. या जगांत कसली कमतरता आहे? जगाच्या या नैसर्गिक संपत्तीचा अनुभव घेऊन आनंदात राहण्याची कला माहित नाही. त्यामुळे आपल्या जीवनांत आनंद रसाचा प्रवाह वाहात नाही. या जगाच्या आंत-बाहेर सर्वत्र परम सत्य व्यापून राहिले आहे. त्या परम सत्याला आपण जाणून घ्यावे. तेव्हा आपणांस आनंदाचा योग घडतो. आपणांस सत्याचा शोध घ्यायला इकडे तिकडे जायला नको. हरवलं तरच शोधायचं ना? अन्यासक्ति टाकून देऊन आपल्या अंतरंगाचे डोळे उघडून पाहिले तर आपण जेथे आहोत, तेथेच सत्यदर्शन !

आपल्या अंतरंगात आणि बहिरंगात सत्य वस्तु सोडून अनेक अन्यासक्ति असतात. त्यामुळे परमसत्य आपणांस अनुभवतां येत नाही. या अन्यासक्तीच्या महापुरांत मनुकुलच वाहून जात असलेले आपण पुराण-इतिहासांत वाचतो. भ.श्रीकृष्ण परम ज्ञानि ! त्याने ज्या भगवद्गीतेचा उपदेश केला; तो हजारो वर्षापासून संपूर्ण भारताच्या नाडीतून स्पंदतो आहे. पण त्याच्याच साठ हजार पुत्रांपैकी एकालासुध्दा गीतेचा तो उपदेश ऐकूं आला नाही. त्याचे बहुतेक पुत्र विषयासक्त, व्यसनाधीन ! पिऊन मदोन्मत्त होऊन आपापसांत मारामारी करून मरून गेले. वैरत्वाने नव्हे...उन्मादाने त्यांचा नाश झाला. आपण या प्रपंचात असावे. कसे? असून नसल्यासारखे. त्यांत आपण गुंतून पडू नये. माणसाने विषयरूपी मंडपात फक्त प्रवेश करायला नव्हे; तर त्यातून

बाहेर पडायला ही शिकावे. हाच शहाणपणा होय !

'सक्ति' म्हणजे बुडणे 'आसक्ति' म्हणजे कधीही बाहेर येतां न येण्यासारखे बुडणे. आपण कोणत्या विषयांत बुडालो आहोत? याचा आपणच विचार करावा. युक्तीने त्यांतून आपली सुटका करून घ्यावी. पुन: त्या विषयांत न गुंतण्याची दक्षता घ्यावी. हीच सत्य साधना होय ! प्रापंचिक विषय वस्तूचे आकर्षण अति अद्भुत! कोणालाही ते आकर्षून घेते. कांही जणांना पैसा-सोने-नाणे यांची आसक्ति, तर कांहीजणांना कीर्ती-प्रसिध्दि यांची आसक्ति ! या जगांत आपली कीर्ती अजरामर व्हावी अशी आसक्ति कांही जणांना असते. त्यामुळे सत्याची आसक्ति असणारे फारच दुर्मिळ !

या प्रपंचात आपणांस पैसा-मान-सन्मान कीर्ती मिळवण्यासाठी प्रयत्न करायला खूप सवड असते. पण साधु-संतांचा शरणांचा सदुपदेश ऐकायला... त्यांचा सत्संग करायला... परम शांति-समाधान मिळवायला आपणांस कोठे बरे सवड असते?

महात्मा बसवेश्वर म्हणतात..

कांचनवेंब नाय नेच्चि निम्म नानु मरेदेनय्या !
कांचनक्के वेळेयल्लदे, लिंगक्के वेळेइल्ल.
हडिकेगे मेच्चिद सोणग
अमृतद रूचिय बल्लुदे कूडल संगमदेवा?

(कांचनरूपी कुत्र्यावरील प्रेमाने मी तुम्हाला विसरलो. कांचनासाठी मजपाशी सवड आहे. लिंग साधनेसाठी वेळ नाही. कुत्र्याला हाडुक चघळण्याची आवड. त्याला अमृताची गोडी कशी बरे कळेल?)

सत्य दर्शनाची आसक्ति कोणालाही नाही, असे नव्हे. अन्यासक्ति कमी करून सत्य जाणून घ्यायची रीत आपणांस कळेना. सत्पथ दाखविणारा सद्गुरू लाभला की पुरे ! आपण सर्वजण सत्यदर्शी होऊ शकतो. अन्यासक्ति दूर करायला आपण कांही विशेष प्रयत्न

करायला नको. जीवनांत मार्गक्रमण करताना आपण सदा जागृत असावे. कोणतातरी एक सुवर्ण क्षण येतो. तेंव्हा आपण जागृत असावे. आपण ऐकलेला एखादा शब्द, पाहिलेले एखादे दृश्य, आठवलेली एखादी घटना, आपली अन्यासक्ती नाहीशी करायला पुरेशी होते. सत्यदर्शनाला सहकारी होते.

तुलसीदासाचे आपल्या पत्नीवर गाढ प्रेम होते. अपार आसक्ति! नुकतेच लग्न झाले होते. एकदां तुलसीदासाची पत्नी घाई गडबडीत पतीला न सांगता माहेरी गेली. तिचे माहेर नदीपलीकडे. पत्नीच्या विरहांत तुलसीदास तळमळू लागला त्याने ताबडतोब सासरी जाण्याचा निर्णय घेतला. पावसाळ्याचे दिवस. नदीला महापूर आलेला. काठांवरील पाला-पाचोळा, झाडे-झुडपे आपल्या कवेत घेऊन नदी घोंघावत वाहात होती. तुलसीदासाला ते कांही दिसले नाही. त्याला दिसले ते पत्नीचे सुंदर रूप तेवढे. मनांत पत्नी भरून राहिली होती. पत्नीविषयी आसक्ति प्रबळ झाली. अंगात नवे चैतन्य संचरले. त्याने बेधडक नदींत उडी घेतली. पाहतां पाहतां तो पोहत पैल तीराला पोहोचला. त्याचे अंग घाणीने माखले होते.

तसाच तो सासुरवाडीला आंला. प्रेमळ पत्नीने पतीला पाहिले. अंग सगळे चिखलाने बरबटलेले. डोळ्यात मात्र प्रेम ओसंडून वाहात होते. पत्नीने विचारले, ''अशा अपरात्री कसे बरे आलांत?''

''तुला भेटल्याशिवाय राहवले नाही म्हणून आलो.'' तुलसीदास म्हणाला. ''येवढे प्रेम तुम्ही देवावर केले असते तर तुम्हाला देवदर्शन घडले असते ना !'', पत्नी म्हणाली.

तिचे बोलणे ऐकतां क्षणीच तुलसीदासाला सत्यदर्शन घडले. मोहाचा अंधार नाहीसा झाला. मनांत ज्ञानाची ज्योत तेवूं लागली.

''तुळसी, तूं माझे अज्ञान नाहीसे करून ज्ञानाचा मार्ग दाखविलेस. तूंच माझी गुरू, मी तुझा दास !''

संसाराची विषयासक्ति नाहीशी होऊन सत्याची दृढ आसक्ति त्याच्या मनांत प्रबळ झाली. त्याच क्षणी तुळसीदास महान संत झाला. परम सत्यदर्शन मिळवून मुक्त झाला.

पत्नीचे बोलणे तुलसीदासाने सर्वांगाचे कान करून सावधान चित्ताने ऐकले. त्या एका सुवर्णक्षणी तो संपूर्णपणे जागृत होता. परिणामी अन्यासक्ति सोडून तो सत्यदर्शी झाला.

एक लग्न मंडप. एका तरूणाचे लग्न लागत होते.

''सुमुहूर्ते सावधान !''

पुरोहिताचा मंत्र घोष कानी पडतांच तो तरूण सावधान झाला. वीर-विरक्तीचा हाच क्षण ''शुभ मुहूर्त !'' असे वाटले. त्या तरूणाला. तत्क्षणीच अंत:पट बाजूला सारून तो विवाह मंडपातून बाहेर पडला. मुक्ति मंदिरात त्याने प्रवेश केला. महान संत झाला. सद्‌गुरू समर्थ रामदास हाच तो ज्ञानी तरूण.

अशा शुभ मुहुर्ताची सुवर्ण क्षणाची साधकाने अत्यंत जागरूकतेने वाट पहावी. हीच श्रेष्ठ जाग्रावस्था होय.



# ४ उत्तिष्ठत जागृत

ही आहे आनंद मीमांसा ! आपले जीवन आनंदपूर्ण करण्याचे चिंतन. सुख आणि आनंद या दोन्ही इच्छाच ! पण त्यात थोडास फरक आहे. सुख हे क्षणिक. येते अन् जाते. आनंद मात्र शाश्वत ! तो सदा सर्वकाळ असतो. इंद्रियांना विषय वस्तूंचा संपर्क झाला की सुख होते. बाह्य इंद्रिय व विषय वस्तूंवर अवलंबून नसतो तो आनंद. सुंदर फूल-वेलीला डोळे पाहतात. जीभ पक्वान्नांची रूचि अनुभवते. कान मधुर शब्द ऐकतात. तेंव्हा आपणांस एक प्रकारचे सुख अनुभवाला येते.

रूप-रस-गंध-शब्दादि आपल्या नाक-कान-डोळ्यांपासून दूर झाले तर आपणांस दुःख होते. कोणतीही विषयवस्तु शाश्वतपणे आपल्याजवळ अथवा आपल्यापासून दूर असूं शकत नाही. त्यामुळे सुख असो वा दुःख असो..शाश्वत नसते. आपणांस आवडत्या वस्तूच्या संबंधाने सुख; नको त्या वस्तूच्या संबंधाने दुःख ! याचा अर्थ असा नव्हे की जीवनांत सुख-दुःख नसावे ! आपण त्या सुख-दुःखाचे स्वरूप जाणून घ्यावे.

आपण नवा बूट पायांत घातला की सुख होते. रस्त्यांतून चालताना तो टोचू लागला, चावू लागला की दुःख होते. उमललेले ताजे टवटवीत फूल पाहिले की सुख, ते कोमेजून गेले की दुःख ! सुख-दुःखे क्षणिक असतात. हे सत्य जाणून घेतले तर जीवनांत त्या सुख-दुःखांचा परिणाम फारसा होत नाही. मन रूपी सरोवरांत उठणारे तरंग म्हणजेच

सुख-दुःख ! तरंगाप्रमाणेच सुख-दुःख ही स्थिर नव्हे. सरोवराप्रमाणे शांत-स्थिर राहणाराच आनंद होय. औषधाची गोळी खाल्याने डोकेदुखी थांबली असतां सुख होते. डोकेदुखी अंगदुखी काही नसून आरोग्यपूर्ण जीवन असणे हाच आनंद ! हा आनंद कोणत्याही विषय वस्तूवर अवलंबून नसतो. म्हणूनच शांत झोप लागली असतां आनंदाचा अनुभव ! आपल्या इच्छापूर्ण झाल्या की सुख नाहीतर दुःख ! इच्छाच नसतील तर केवळ सुख अथवा आनंद ! सुखाचे सूत्र ते हेच ! जीवनांत सुख-दुःखाचे तरंग येवोत अथवा न येवोत आपल्या अंतरंगात समाधान हे सागरांत तरंग सामवल्याप्रमाणे सामावून जावे. हाच आनंदयोग होय !

वाद्यवृंदामध्ये एक सनईवाला एकच स्वर वाजवीत असतो. बाकीचे लोक राग-ताल यांना अनुसरून स्वरामध्ये चढ-उतार करीत असतात. या सनईची श्रुति मात्र एकसुरांत वाजत असते. जीवनांत सुख-दुःख, मान अपमान, कसलाही उतार-चढाव आला तरी मूळ श्रुति मात्र एकच असूं द्यावी. ॐकार...शांती...समाधानाची सत्य-श्रुति. ती मूळ श्रुति धरून आपण जन्मापासून मृत्यूपर्यंत सर्व गीते गाऊं शकतो. वैद्य, वकील, राजा, रयत कोणतीही भूमिका करीत असला तरी मनुष्याच्या जीवनांत ही सत्याची श्रुति एक असावी. कोणत्याही परिस्थितीत प्रक्षुब्ध न होतां तरंग रहित असे सत्य-समाधान हेच आनंदाचे मूळ होय. असा हा आनंदयोग ज्या क्षणी आपणांस लाभेल, त्या क्षणाची आपण अत्यंत जागरूकतेने वाट पहावी.

सत्य दर्शनाचा...आनंद योगाचा तो अमृतक्षण प्राप्त व्हावा म्हणून साधकाने जागरूकतेने वाट पहावी हे खरे ! पण तो सुवर्णक्षण केंव्हा बरे लाभेल? लॉटरी प्रमाणेच एखाद्या भाग्यवंताला तो क्षण लाभतो. लॉटरी कोणाला लागते? लाखो लोकांतून एखाद दुसऱ्याला. त्या लॉटरीत गमावणाऱ्यांची संख्याच फार मोठी असते. सत्यदर्शन होण्याची वाट पहात थांबले असता क्वचितच एखाद्याला सत्यदर्शनाचा योग

येईल. इतर लोक अज्ञानाच्या अंधारातच चाचपडत राहतात. तसे होऊं नये म्हणून आपण सतत साधना केली पाहिजे.

आध्यात्मिक क्षेत्रांत सत्य साक्षात्कारासाठी कराव्या लागणाऱ्या साधना पध्दतीना तोटा नाही. आपणांस इष्ट असेल तशी साधना निवडून आपण त्या क्षेत्रांत प्रगति केली पाहिजे. मात्र आपल्या साधनेची दिशा योग्य असावी. त्या दिशेत सतत प्रगति होत असावी. योग्य त्या दिशेने अत्यंत मंद गतीने प्रगति झाली तरी हरकत नाही. आज ना उद्यां आपण आपले ध्येय गाठूं शकतो. याला एक साधा आणि सरळ उपाय म्हणजे साधु-संतांचे-शरणांचे अमृत वचन श्रवण करणे. अनुभावी साधुसंतांच्या अंत:करणापासून निघालेली वाणी ऐकली तर आपल्या जीवनांत अगाध परिवर्तन घडते. जीवनाला एक नवा अर्थ... नवे रूप लाभते. सत्य दर्शनाला संतवाणी सहकारी होते. महापुरूषांच्या वाणीत केवढे सामर्थ्य आहे? श्री चेन्न बसवेश्वर म्हणतात.

पाताळदग्धवणेय नेणिल्लदे तेगेयबहुदे?
सोपानद बलदिंदल्लदे?
शब्दसोपानव कट्टि नडयिसिदरू पुरातनरू
देवलोकक्के बट्टे काणिरो
मर्त्यर मनद मैलिगेय कळेयलेंदु
गीत मातेंब ज्योतिय बेळगि कोट्टरू
कूडलचेन्न संगन शरणरू

(खोल विहिरीतील म्हणजेच पाताळातील पाणी दोरी अथवा पायऱ्यांच्या सहाय्या शिवाय काढतां येईल काय?

संतांनी शब्दांचा सोपान बांधून त्या पाण्यापर्यंत आपणांस पोहोचविले. येवढेच नव्हे तर देवलोकापर्यंत आपणांस जातां आले.

मर्त्य मानवाच्या मनांतील मळ निपटून काढण्यासाठी गीत व उपदेश यांची ज्योत पाजळली कूडल चेन्न संगाच्या शरणांनी !)

एक खोल विहीर. त्यांत स्वच्छ शीतल अमृतजल ! ते कसे मिळवावे ? विहिरीला पायऱ्या तरी असाव्यात अथवा आपणांपाशी दोरी असावी. ती दोन्ही साधने नसली तर काय करावे? पाणी डोळ्यांना दिसते पण आपणांस ते मिळत नाही. तहान भागत नाही. मानव जीवनसुध्दा एक खोल विहीर. त्यांत परमानंदाचे जल. ते जल मिळविण्यासाठी संतांनी-शरणांनी अनुभाव शब्दांचा उपयोग केला. त्या उपदेशाने त्यांनी ब्रह्मलोक...देव लोकाला पोहोचण्याचा दिव्य मार्ग निर्माण केला. सत्यदर्शन मिळवून ते धन्य झाले. अशा संत-महंतांचा उपदेश मन:पूर्वक ऐकणे, हेच आनंदयोगाचे प्रथम साधन होय !

ऋषि-मुनींनी सत्य दर्शनाच्या ब्रह्मानुभवाच्या असंख्य मंत्रांचा प्रवाहच या देशांत हजारो वर्षापूर्वी वाहात ठेवला. बुध्दाने पदोपदी निर्वाणाचा उपदेश केला. महावीराने अहिंसेचे अमृतकण पसरविले. चैतन्य महाप्रभूंनी देशभर भक्ति-सुमने पसरविली. संत मीराबाईने मधुराभक्ति गीत गंगा देशभर वाहविली. दक्षिणेत संतांनी, शरणांनी, दास-अळवारांनी, आत्मानुभवाचा ----- वचन अभंगाचा वर्षाव केला. अशा अनुभावी संतांचा उपदेश आपणांस अंधारातून प्रकाशाकडे, असत्यापासून सत्याकडे, मृत्यूपासून अमृताकडे घेऊन जातो. अशा संत महंतांचा उपदेश मन:पूर्वक श्रवण करणे.हेच आनंदयोगाचे प्रथम साधन !

एक होता शेतकरी. त्याचा मळा फारच सुंदर. समृध्द पीक आलेले. गोड रसाळ फळांनी मळा बहरलेला. त्यांची विक्री करून वर्षभर आरामांत राहता येईल असा त्याला विश्वास. रात्री खूप दारू पिऊन तो निश्चिंतपणे झोपी गेला. जंगली जनावरांनी रात्री त्या बागेंत धुमाकूळ घातला. सकाळी उठून पाहतो; तों तेथे कांहीही उरले नव्हते. सर्वनाश झाला होता. दु:ख करून काय उपयोग?

मानव जीवन हे सुध्दा देवाने दिलेला एक सुंदर मळा. सुख-

समाधान देऊ शकणारी पंचज्ञानेंद्रिये, पंच कर्मेंद्रिये यांनी बनलेला हा देह ! मुक्तीचे परमानंद पद देऊ शकणारे प्रचंड सामर्थ्य असलेले मन-बुध्दि अदि ! किती भव्य दिव्य सुंदर मळा, हे मानव जीवन ! पण मानवाने जाग्रत राहून जीवनाचा सदुपयोग करून घेतला नाही. विषयासक्त होऊन संसाराच्या मोहांत मदांध होऊन झोपी गेला, काम क्रोधादि जंगली जनावरांनी या मानव जीवनरूपी मळ्याचा विध्वंस केला. सबंध आयुष्य गेल्यानंतर अंत्यकाळी आपले उध्वस्त जीवन पाहून शोक करून काय लाभ? जीवनरूपी मळा उध्वस्त होण्यापूर्वीच मानवाने जागृत होऊन सुज्ञानाच्या प्रकाशांत जीवनाचा हा मळा राखावा.

दशरथ महाराजाला शिकारीची फारच आवड होती. अंधारात बाण मारून तो शब्दवेध करूं शकत असे. एकदां रात्रीच्या वेळी तो मृगयेसाठी अरण्यांत गेला. नदीच्या कांठावर पाणी प्यायला जंगली जनावरे येत असतात. त्यांची वाट पहात तो थांबला.

श्रवणकुमार एक तरूण. अंध मातापित्यांना कावडीत बसवून खांद्यावर घेऊन तीर्थ यात्रा करायला निघाला होता. एका झाडाखाली माता-पित्यांना बसवून पाणी आणायला नदी तीसवर गेला. पाणी भरतांना झालेला आवाज ऐकून, ते जंगली जनावर असावे असे समजून दशरथाने शब्दवेधी बाण चालविला. श्रवणकुमार घायाळ झाला. मातापित्यांना देवाप्रमाणे मानून फुलाप्रमाणे त्यांना उचलून घेऊन त्यांना तीर्थ क्षेत्र दर्शन घडविणारा एक महान संत प्राणांना मुकला.

हा घोर अनर्थ पाहून दशरथ राजा गांगरला. श्रवण कुमाराच्या माता-पित्यांना त्याने ही बातमी सांगितली. दुःखी माता-पित्यांनी ''तुला सुध्दां आमच्याप्रमाणेच अंत्यकाळी पुत्रवियोग घडो !'' असा शाप दिला. शेवटी दशरथाला पुत्रवियोगांत तळमळून प्राण सोडावा लागला.

माणसाने अज्ञानाच्या अंधारात देहभान विसरून एक पाऊल

सुध्दा पुढे टाकू नये. सद्गुरूनी दाखविलेल्या सुज्ञानाच्या प्रकाशांत जागरूकतेने निरंतर पुढे जाऊन आनंदगिरीला पोहोचावे !



# ५ धर्म रसायन

धर्म हा देवा येवढाच पवित्र. विश्वा येवढा विशाल. एका लहानशा बीजामध्ये जसा विशाल वृक्ष सामावलेला असतो. तसेच धर्म या शब्दामध्ये प्रपंच व परमार्थ दोन्ही सामवलेले असतात.

'धर्मोहि देव:'

धर्मच देव. धर्म अथवा देव नसेल तर हे जगच असणार नाही. परमसत्य परमात्म्यावर हे जग अवलंबिले आहे. सत्य-धर्म च विकसित होऊन जगाचे रूप धारण केले आहे.

'धार्यते अनेन इति धर्म:'

जो रक्षण करतो, तोच धर्म होय ! या विश्वाचा नाश होणार नाही याची काळजी घेऊन या विश्वाचे रक्षण करणारी परम शक्तीच धर्म ! आपल्या डोळ्यांतील तेज, मनांत उत्पन्न होणारे ज्ञान, शरीरांत संचार करणारा प्राण, हे सर्व या मातींतून उत्पन्न झाले. समस्त सचराचर सृष्टि या मातीवर जगते. माती नसेल तर गवत नाही; झाडे-झुडुपे नाहीत; कृमि कीटक नाहीत; पशु-पक्षी नाहीत; मनुष्य नाही. समस्त जगाला अस्तित्वच नाही. म्हणून मातीच खरा देव ! खरा धर्म !

गरीब-श्रीमंत, ज्ञानी-अज्ञानी,पापी-पुण्यवान, उच्च-नीच असा भेदभाव न बाळगतां सर्वांना अन्न-आश्रय देऊन सर्वांचे रक्षण करणारी माती, धर्म नसेल तर आणखी कशाला धर्म म्हणावे? एकवेळ देवळांत मूर्ति नसेल, मठांत ग्रंथ नसतील तरी आपण जिवंत राहू शकतो. पण घाम गाळून राबणाऱ्या सर्वांना अन्न पाणी देण्यात भेदभाव न करणारी

ही माती नसेल तर कोणीही माणूस जिवंत राहूं शकत नाही. देव सुध्दा जगणार नाहीत. म्हणून मातीच खरा नैसर्गिक धर्म होय! आपण कोठल्याही देशांत असो, कोणत्याही काळांत असो आपल्या पायाखाली राहून आमचे रक्षण करणाऱ्या या भू-मातेला प्रथम वंदन केले पाहिजे.

या जगाची निर्मिती करण्यात मातीशी खांद्याला खांदा भिडवून श्रमणारे पाउस-वारा, प्रकाश, आकाश हे सुध्दा नैसर्गिक धर्माचे महत्वाचे अंगच होत. आपले पंचप्राण असे हे पंच महाभूत. त्यांना स्वच्छ परिशुध्द ठेवून घेऊन जगणे हाच खरा धर्म! देवाचे दर्शन घेण्यासाठी लोक दूरदूरचा प्रवास करतात. आपल्या सभोवती असून नित्य आपले रक्षण करणारा निसर्गच खरा धर्म , खरा देव! याचा अनुभव घेणे हाच आनंद योग!

जगाच्या साहित्यांत धर्म या पदाचा जेवढा उपयोग झालेला आहे, तेवढा अन्य कोठल्याही पदाचा उपयोग झालेला नसेल. जगांतील अनुभावि संतांनी धर्म या पदाला वेगवेगळी नांवे दिली आहेत. लॅटिन भाषेत धर्माला 'रिलीजन' (Religion) म्हणतात. रिलीजन म्हणजे बांधणे. मनाने मनाला, मनाने सत्याला, मनाने जगाला जवळ आणणे, बांधणे म्हणजे धर्म. धर्म हा सवालीप्रमाणे, एखादा प्रवासी उन्हातून पायी चालत येतो. उन्हाने देह तापलेला असतो. समोर आम्रवृक्षाची थंडगार सावली दिसते. त्याला नकळत त्याची पाऊले सावलीच्या दिशेन चालायला लागतात. त्या आम्रवृक्षाने आपले बाहू पसरून त्या वाटसराला बोलाविलेले असते. ती हांक वाटसराच्या ह्रदयाला पोहोचलेली असते. ही मानवाची भाषा नव्हे. वृक्षाची भाषा...निसर्गाची भाषा! धर्म हा एक विशाल वृक्ष! त्या विशाल वृक्षाच्या बुंध्याशी घनदाट सावली आहे. शांतिरूपी सावली! संसाररूपी घोर अरण्यांत चालून-चालून माणूस थकतो. धर्मरूपी वृक्ष त्याला चिरशांति अनुभवण्यासाठी बोलावतो आहे.

एक पाश्चात्य तत्वज्ञानी धर्माची व्याख्या करतो. त्याचा भाव असा कीं, पाहणारे डोळे कोट्यावधी असतील. पण जगांत सूर्य एकच चंद्र ही एकच ! तसेच या जगांत असंख्य लोक आहेत. पण ते सर्वजण आचरण करतात तो धर्म एकच आहे. सर्वांना सूर्याप्रमाणे ज्ञानाचा प्रकाश, चंद्राप्रमाणे शांतीची शीतलता जो देतो तोच धर्म !

असा धर्म म्हणजे अनेक सुंदर भावनांचे एक मधुर रसायन ! या रसायनाचे पान करतांच मानवाच्या हृदयांतील कटु भावना नाहीशा होतात. जीवन मधाप्रमाणे गोड होते. अशा मधुर भावना प्राप्त व्हाव्यात म्हणून भारतीय ऋषीनी नित्य भगवंताची प्रार्थना केली.

आपल्या शेजाऱ्या पाजाऱ्यांची सुंदर घरे, कपडे-लत्ते, शेती-वाडी पाहून आपणांस आनंद व्हावा. दुसऱ्यांची उन्नति पाहून आपल्या हृदयांत द्वेष, कटुता निर्माण झाली तर आपण धर्म रसायनाचे पान केले नाही असा त्याचा अर्थ होतो.

बोलणे मधाप्रमाणे गोड, मनांत कटु विष भरलेले असेल, तर तो धर्म नव्हे ! हृदयांतील कटुता ज्यांनी घालविली तेच संत-शरण ! हृदयांतील कटुता नाहीशी करणे; धर्म रसायन पानानेच साध्य ! धर्म नसेल तर हृदयांतील कटुता अथवा द्वेष नाहिसा करणे असाध्य ! हृदयातील कटुता थोरामोठ्यांना सुध्दा छळलेली उदाहरणे आपण पुराण आणि इतिहासात पाहतो.

कृतयुग संपून त्रेता युगाचा प्रारंभ झाला होता. जमदग्नि महाऋषि. त्यांची पत्नि रेणुका देवि. त्यांना परशुरामासह चार पुत्र. आश्रमात सुंदर ऋषि जीवन कंठत होते. जमदग्नि ऋषि बाहेर गेलेले असाताना कार्त्यवीरार्जुन ऋषि जमदग्नि ऋषींच्या आश्रमात आला. घरी आलेल्या अतिथीचे यथोचित स्वागत सत्कार करणे हा गृहस्थ धर्म. जमदग्नि ऋषिच्या कुटुंबाने कार्त्यविर्यार्जुनाचा यथोचित स्वागत-सत्कार केला. कार्त्यविर्यार्जुनाने संतोषाने त्यांचा अतिथी सत्कार स्वीकारला.

परत जात असतां कार्त्यवीर्यार्जुनाला आश्रमाच्या आवारांत एक सुंदर गायीचे वासरू दिसले. कार्त्यवीर्यार्जुन ऋषीने कोणालाही न सांगता ते वासरू आपल्या आश्रमांत नेले.

वासराला न पाहून गाईने हंबरडा फोडला. तेवढ्यांत आश्रमात परत आलेल्या जमदग्नि ऋषींना ही हकीकत समजली. क्रोधाने लाल होऊन जमदग्नि ऋषीने कार्त्यवीर्यार्जुनाच्या आश्रमाला जाऊन त्याचे हात पाय तोडून टाकले. कार्त्यवीर्यार्जुनाच्या मुलांनी सूड उगवण्यासाठी जमदग्नि ऋषींचा वध कला. ही कटुता तेवढ्यावरच थांबली नाही. परशुरामाने ही कटुता वमन करतांच एक मोठी द्वेषाची नदीच वाहू लागली.

परशुरामाने पृथ्विप्रदक्षिणा करून या पृथ्वीतलावरील सर्व क्षत्रियांचा एकवीस वेळा नि:पात केला. शेवटी प्रभुरामचंद्राच्या हाती पराभूत होईपर्यंत परशुरामाचा हा द्वेषाग्नि पसरतच राहिला.

साक्षात भगवान विष्णूंचा अवतार मानल्या गेलेल्या परशुरामाची ही कथा. तर मग सामान्य लोकांची काय वाट?

या विषाला उतारा म्हणजे धर्म रसायन पान होय. वरील कथा सांकेतिक असली तरी हृदयाच्या कटुतेमुळे केवढे अनर्थ होतात याचे सुंदर चित्रण या कथेत आहे.

मानवाच्या हृदयांतील कटुता नाहीशी झाली तर सासु-सुनेमध्ये, बंधु-मित्रामध्ये, भावा-भावामध्ये भेदभाव नाहीसा होऊन जीवन नंदनवन होते. ते साधणे हेच धर्म रसायन होय !



# ६ आत्मावलोकन

प्रशांत जीवनाच्या पूर्णानंदाची साधने अनेक. त्यांपैकी एक साधन धर्म रसायन. त्याने अन्यासक्ति नाहीशी होते. सत्याचा आविष्कार होतो. सुज्ञानोदय, सदानंद ! हाच आनंद योग ! त्याला बाधक म्हणजे आपल्या हृदयातील कटु भावना. ही कटु भावना नाहीशी करायला धर्म हे एक सुंदर साधन. त्यासाठी आपल्या मनाचे अवलोकन स्व परिक्षण झाले पाहिजे. आत्मावलोकन झाले पाहिजे.

लोकद डोंक नीवेके तिद्दुविरि ?
निम्म निम्म तनुव संतैसिकोळ्ळि
निम्म निम्म मनव संतैसिकोळ्ळि
नेरे मनेयवर दुःखक्के अळुवर मेच्च
कूडलसंगमदेव

(जगाचा वाकडेपणा तुम्ही कां सुधारतां? तुमचे शरीर सुधारून घ्या. तुमचे मन सुधारून घ्या. शेजाऱ्याच्या दुःखाने रडणारा आमच्या कूडलसंगमदेवाला आवडत नाही.)

हे जग कसे आहे? या जगातील लोक कसे आहेत? याचा विचार करून आपले मन कलुषित करून घेऊ नका. हे जग कसेही असू द्या आपण कसे आहोत.? आपले अंतरंग कसे आहे? याचा विचार करा. तेथे फूल-कांटे, अमृत-विष, माधुर्य-कल्मष, प्रकाश-अंधार यापैकी काय आहे? याचा विचार करा.

आपल्या घरांत एक छोटासा दिवा असावा. मोगऱ्याची चार

सुवासिक फुले विखुरली असावीत. अतिथि सत्कारासाठी एक दोन मधुर फळे असावीत. असे घर लहान असले तरी; अथवा मोठे असले तरी त्या घराला दैवी कळा येते. आनंदाचा प्रकाश तेथे वाहूं लागतो. घर स्वर्गासमान बनते. या उलट घरांत केरकचरा दगड-धोंडे, अंधार-कटुता भरलेली असेल तर त्या घरांत आणि नरकांत काय फरक?

हा देहसुध्दा देवाने दिलेले चालते-बोलते जीवंत घरच. यांत ज्ञानाचा प्रकाश, सद्भावनेचा सुगंध, सत्क्रियेची मधुर फळे असावीत. तेंव्हा हा देहच देवालय. जीवनच स्वर्ग ! तसे नसेल तर या देहांत अज्ञानाचा अंधार दुर्भावनेचा दुर्गंध, दुष्कृत्यांचे दगड-धोंडे, कांटे-कुटे असतील तर हे जीवन नरक समान होते. आपले जीवन स्वर्गासमान आनंददायक झाले पाहिजे. तेंव्हा दुसऱ्यांनासुध्दां आनंद देतां येतो. त्यासाठी आपण आपले दोष सुधारावेत. याचा अर्थ आपण दुसऱ्यांना चांगला सल्ला देऊ नये; सदुपदेश करू नये; असा नव्हे. आपल्या ठिकाणी दोष असतांना दुसऱ्यांचे दोष दाखविणे योग्य नव्हे. आंधळ्याला आंधळ्याने मार्गदर्शन करणे कितपत योग्य आहे? लोकोध्दार करायला तयार होण्यासाठी आत्मोध्दार करणे...आत्मावलोकन करणे आवश्यक आहे. असे महात्मा बसवेश्वर सांगतात.

मनेयोळगे मनेयोडेयनिद्दानो इल्लवो?
होस्तिलल्लि हुल्लु हुट्टि, मनेयोळगे रज तुंबि,
मनेयोळगे मनेयोडेयनिद्दानो इल्लवो?
तनुविनोळगे हुसि तुंबि, मनदोळगे विषय तुंबि
मनेयोळगे मनेयोडेयनिल्ल कूडल संगमदेव !

(घरात घरधनी आहे की नाही? उंबरठ्यात गवत उगवले घरांत धूळ भरली. घरांत घरधनी आहे की नाही? शरीरांत खोटेपणा भरला आहे, मनांत विषय भरले आहेत. कूडलसंगमदेवा घरांत घरधनी नाही)

आपल्या अंगणात गवत माजले, घरांत धूळ भरली. याचा अर्थ आपण घरांत नाही. असलो तरी जागे नाही. या देहाच्या आंगणांत शब्द,स्पर्श, रूप, रस, गंधादि तण माजले आहे. मनांत विषय वासनेची दुर्भावाची कटुता रूपी धूळ साचली आहे. या देह रूपी घरांत असूनही आपण नसल्यासारखेच होय. अज्ञानाचा अंधार दूर करून विस्मृतीची निद्रा झटकून जागे व्हावे. डोळे उघडून बाहेर यावे. निसर्गाने दिलेले हे सुंदर देहरूपी घर स्वच्छ करावे. विषय वासना, कटु भावना टाकून द्याव्यात. तेंव्हा हे जीवनच स्वर्ग.

हृदयांतील द्वेष असूया आदि कटु भावना टाकून दिल्या नाहीत तर आपला पैसा-अडका, विद्या-बुध्दि, स्थान-मान कोणतेही आपणांस संतोष-समाधान देणार नाहीत. श्रीमंतांना पाहून गरीबाच्या मनांत, गरीबांना पाहून श्रीमंतांच्या मनांत परस्पर द्वेष, असूया असतील तर आपल्या अंत:करणांत कटुता असे पर्यंत आपणांस बाह्य जग आणि जीवन कसे बरे गोड होईल?

दोन मुंगळे एकदां वाटेत एकमेकांना भेटले. एका मुंगळ्याचे कुटुंब निंबाच्या झाडावर, दुसऱ्या मुंगळ्याचे कुटुंब साखरेच्या डोंगरावर. निंबाच्या झाडावर राहणारा मुंगळा हाडकुळा तर साखरेच्या डोंगरावर राहणारा मुंगळा गुबगुबीत होता. त्याने निंबाच्या झाडावरील मुंगळ्याला विचारले, ''मित्रा, तू इतका हाडकुळा आणि अशक्त कशाने झालास? तुला खायला प्यायला भरपूर मिळते ना?''

''मित्रा मला कोठून बरे भरपूर आहार मिळेल? मी तर निंबाच्या झाडावर राहतो ना?''

''तर मग माझ्या घरी चल . तेथे तुला मनसोक्त साखर खायला मिळेल.''

''ठीक आहे. येईन मी. पण माझ्या घरी बायकोला सांगून येतो.'' असे म्हणून ती गोड बातमी सांगायला मुंगळा निंबाच्या झाडाकडे

धावला. आपल्या मित्राचे आमंत्रण सांगून त्याने आपल्या बायको मुलांना विचारले, ''तुम्हीसुध्दा माझ्याबरोबर याल काय?''

बायको म्हणाली, ''आधी तुम्ही पुढे जाऊन दोनचार दिवस राहून पहा. बरे असेल तर आम्हाला सुध्दा घेऊन जा.'' जाताना तिने नवऱ्याला निंबाच्या रसाचे लाडू बांधून दिले.

मित्राच्या घरी साखरेच्या डोंगरावर रहायला आल्यानंतर मुंगळा रोज सकाळी बायकोने दिलेला निंबाच्या रसाचा लाडू दाढेत ठेवून घेई. साखरेच्या डोंगरावर कांहीही खाल्ले तरी त्याला ते कडूच वाटे. त्याने मित्राकडे तक्रार केली.

मित्र म्हणाला, ''येथे सर्व गोडच: कडू कांही असणे शक्यच नाही. तूं तुझ्या दाढेत एखादी गोळी-बीळी ठेवून दिली आहेस काय?'

''होय मित्रा, माझ्या बायकोने निंबाच्या रसाचे लाडू दिलेत ते मी दाढेत ठेवतो.''

''अरे थुंकून टाक ती निंबाची गोळी. त्यानंतर साखर खाऊन पहा''

मुंगळ्याने निंबाच्या रसाची गोळी थुंकून चूळ भरली. त्यानंतर साखर चाखून तो मुंगळा म्हणाला, ''मित्रा, हा खराखुरा गोड साखरेचा डोंगर आहे''

हे सगळे जग म्हणजे देवाने निर्माण केलेला साखरेचा गोड डोंगर. सत्यं-शिवं-सुंदरं हे जग. आपल्या हृदयांतच कटुता भरून राहिल्याने हे सगळे जग आसणांस कडू वाटते. कुरूप दिसते. ही कटुता नाहीशी करायला आपण सद्‌गुरूपाशी जाऊन धर्मरसायन पान करावे. तेंव्हा आपले जीवन गोड ! मधाची नदी वाहिल्याप्रमाणे. आनंद-रस सागर !

धर्माच्या विविध गुण लक्षणांचा आपण विचार करीत आहोत. आतां धर्माचे आणखी एक सुंदर लक्षण पाहूं या !

एक अनुभावि संत सांगतात, ''धर्म म्हणजे परम सत्याकडे... मोक्षाकडे नेणारा मार्ग !''

धर्म म्हणजे राजमार्ग ! गगनमार्ग ! आपल्या वाटेत खांच खळगे, दगड-धोंडे, कांटे-कुटे भरलेले आहेत. देव निर्मित आकाशमार्गात खांच खळगे, दगड-धोंडे, कांटे-कुटे कांहीच नाहीत. हजारो-लाखो वर्षापासून पक्षी गगन मार्गात संचार करीत आहेत. पण तो रस्ता कधी झिजला नाही की मलीन झाला नाही. मानव निर्मित धर्म हे जमीनीवरील रस्ते. या रस्त्यात खड्डे आहेत, भांडण-तंटे आहेत. देवनिर्मित नैसर्गिक धर्म हा विशाल आकाशमार्ग असल्याप्रमाणे. या मार्गात सर्वांना सदा सुख समाधान, शांति. या जगाला निर्माण करणाऱ्या, त्याचे रक्षण करणाऱ्या, त्याला अंतिम आश्रय देणाऱ्या अनंत सत्याकडे नेणारा महामार्ग... राजमार्ग म्हणजेच धर्म होय !

रस्ता असतो येण्या-जाण्याला. तेथेच घर बांधून रहायला नव्हे. धर्म मार्ग केवळ उपदेश करून, ऐकून ऐषआरामात राहण्यासाठी नाही. त्या मार्गात सतत चालून सत्यदर्शन करून घेण्यासाठी असतो. आनंद निलयापर्यंत पोहोचण्यासाठी असतो. आपण यत्किंचितही दुर्लक्ष केले तर वाट चुकते. ध्येय निसटून जाते. जीवन अस्तव्यस्त होते. आपण केलेले श्रम, आपली साधना, सर्व कांही निरर्थक होते.

तो गौतम बुध्दाचा काळ. त्याच्या एका शिष्याने कित्येक वर्षे सत्संगांत राहून, धर्म पथ... निर्वाण पथ जाणून घेऊन बुध्दाची आज्ञा घेऊन दूर देशी धर्मोपदेश करायला गेला. तो तरूण, महत्वाकांक्षी होता. त्याने एका भव्य बुध्द मंदिराच्या निर्माणाची योजना तयार कली.त्यासाठी सर्वत्र संचार करून खूप धनसंग्रह केला. अति भव्य बुध्द मंदिराची निर्मिती केली. गाभाऱ्यात बुध्दाची सुंदर शिलामूर्ति स्थापन केली. त्या प्रदेशांत अशी भव्य वास्तु दुसरी कोणतीच नव्हती. लोकांनी त्या तरूण भिक्षूची खूपच प्रशंसा केली. त्या प्रशंसेने संतुष्ट होऊन त्या तरूण भिक्षूने आणखी

एक योजना आखली. बुध्दाच्या शिलामूर्तीच्या जागी सुवर्णमूर्ति बसवायची योजना. त्यासाठी तो तरूण भिक्षु बुध्दाच्या सुवर्ण मूर्तीचे स्वप्न पहात झोळी घेऊन देश संचाराला निघाला.

तेथून कांही भक्त बुध्दाच्या दर्शनाला गेले. त्या तरूण भिक्षूच्या साहसाची हकीकत त्यांनी बुध्दाला सांगितली तर बुध्दाला सुध्दा संतोष होईल असे वाटून त्यांनी सविस्तरपणे वर्णन करून सांगितले. बुध्दाने त्या क्षणी हाती भिक्षा पात्र व दंड घेऊन त्या तरूण भिक्षूकडे प्रस्थान केले. त्याला विचारले, ''काय करतो आहेस?''

''मी आपले भव्य मंदिर बांधतो आहे'' शिष्य म्हणाला.

बुध्दाने मंदस्मित केले. म्हणाला, ''तूं वाट चुकलास''

शिष्य घाबरला. त्याने विचारले, ''गुरू महाराज, मी वाट कशी चुकलो'' तेवढ्याच शांतपणे बुध्द म्हणाला, ''मी तुला निर्वाण पथाचा उपदेश केला होता. निर्माण पथाचा नव्हे !''

शिष्याला त्याचक्षणी आपली चूक समजली. तो बुध्दाच्या चरणी वंदन करून म्हणाला, ''बुध्दं सरणं गच्छामि !'' तो पुन: खऱ्या निर्वाण पंथात धर्म पंथात पुढे चालून धन्य झाला.

अशाप्रकारे खऱ्या नैसर्गिक धर्म पथामध्ये पुढे चालण्यापूर्वी साधकाने आत्मावलोकन करून आपल्या हृदयांतील कटु भावनांचा त्याग करून मधुर भाव असलेल्या धर्म रसायनाचे पान करावे. तेंव्हा जग व जीवन सर्व कांही आनंद सागर !



# ७ श्रध्दा

धर्म म्हणजे देव ! आणि देवाकडे जाण्याचा मार्ग ही ! या अर्थाने धर्म हाच जीवनाचा मार्ग. धर्म हेच ध्येय ! धर्म हेच साधन ! धर्म हेच साध्य ! दीप आणि दिप्ती, चंद्र आणि चांदणे, सूर्य आणि सूर्य-किरण एकमेकांपासून वेगळे करतां येत नाही. त्याप्रमाणे धर्म आणि देव यांचा अविनाभाव संबंध.

एक पाश्चिमात्य तत्वचिंतक अनुभावि धर्माविषयी म्हणतो,

''तू खेळाच्या मैदानांत असशील तर तो सुंदर खेळ. तू घरांत असशील तर ते पवित्र, परिशुध्द प्रेम. तू कामांत असशील तर ती कार्यमग्रता. तू विशाल आकाशांत पाहिलेस तर तो भव्यतेचा भाव''

खेळाच्या मैदानात असतांना प्रामाणिकपणे खेळणे हाच धर्म. हार-जीत यांना समान दृष्टीने पहावे. प्रतिस्पर्ध्याला मित्राप्रमाणे पहावे. खेळाचे सर्व नियम कांटेकोरपणे पाळावेत. तो प्रामाणिक खेळ. त्यामुळे खेळाडूंची हृदये परस्परांजवळ येतात. देशादेशांत भावैक्यता उत्पन्न होते. तो खरा खेळ. तोच धर्म !

घरांत असतांना धर्म म्हणजे परिशुध्द प्रेम. माता घरांत कामांत मग्न असते. घरदार स्वच्छ करते. स्वयंपाक करते. घरांतील सर्वांना प्रेमाने वाढते. सकाळ पासून संध्याकाळ पर्यंत अविश्रांत काम करते. सर्वांगाचे नेत्र करून माता शाळेतून घरी परतणाऱ्या आपल्या मुलाची वाट पाहते. संध्याकाळी मुलगा शाळेतून घरी परत येतो. त्याला पाहतांच मातेचे सर्व श्रम परिहार पावतात. मातेच्या हृदयाचे हे परिशुध्द प्रेमच

धर्म होय !

काम करीत असतां त्या कामांत मग्नता हाच धर्म. आठरा वर्षाची एक तरूणी. ती आपल्या लग्नाचे वस्त्र विणत होती. सूर्यास्ताची वेळ. त्यांच्या दारापुढे एक अनुभावि संत उभा होता. तरूणी आपल्या कार्यात मग्न होती. आणखी कशाचेही भान तिला नव्हते. कांही वेळानंतर संतानेच तिला विचारले, ''बाळ तू विणकामांत किती मग्न आहेस बरे !'' तिने संतांना वंदन केले. म्हणाली, ''मग्न नको होऊ; तर काय करू संत महाराज, हे वस्त्र माझ्यासाठी, माझ्या पतीसाठी आम्हा दोघांसाठी विणत होते. या वस्त्रामध्येच आमचे साताजन्माचे सौख्य-स्वर्ग !''

संत म्हणाला, ''मुली तू धन्य आहेस. कार्यमग्नता म्हणजे काय? हे मला आतां समजले.''

कार्यमग्नतेमुळे जीवनांत कला कुसुम विकसते. जीवनांत संतोषाचा सुगंध दरवळतो.

अंतरिक्षाकडे पहात असतां धर्म हा भव्यतेचा भाव ! या विशाल आकाशांत आपला रूपेरी प्रकाश फैलावीत चमकणारे असंख्य तारे, आकाश गंगा, निळे मेघ, हे सर्व पाहतांच आपल्या ठिकाणी त्या अनंत आकाशाविषयी गौरव उत्पन्न होतो. भव्यतेचा भाव भरून राहतो. हा सद्भावच धर्म होय.

खेळांत प्रामाणिकता, मिलनांत प्रेम, कार्यात निमग्नता, दृष्टीत भव्यतेचा भाव... हा धर्म ! असा खरा नैसर्गिक धर्म जीवनातून वेगळा करतां येत नाही. रवि-रश्मि, चंद्र-चांदणे, दीप-दिप्ति या प्रमाणे या धर्माला आणि जीवनाला अविनाभाव संबंध. जो जीवनातून वेगळा करता येतो तो खरा नैसर्गिक धर्म नव्हे. कृत्रिम धर्म ! माणसाने खरे नैसर्गिक धर्म रसायन पान करावे. त्यामुळे आपल्या डोळ्यांत तेज, ह्रदयांत माधुर्य, मनांत शांति, आपले जीवन भव्य-दिव्य ! या धर्म रसायनाचे घटक कोणते? ते आपण पाहूं !

निसर्गाने आंबा अणि निंब, द्राक्षे अणि डाळिंब वगैरे फळांमध्ये कसले षड्रस भरून ठेवले आहे ! अशी रसाळ फळे निर्माण करण्यात झाडे-झुडुपे रात्रंदिवस मौनपणे मग्न आहेत. ती फळे चाखून पक्षी याच भूमी आकाशांत विहार करून स्वर्ग सौख्य अनुभवतात. त्याप्रमाणे निसर्ग निर्मित धर्म फलाचे रसास्वादन करून संत-महंत त्या भगवंताला आठवत मोठ्या संतोषाने जीवन जगले. या नैसर्गिक धर्म रसायनांत श्रध्दा, सदाचार, समरति असे तीन मुख्य घटक. त्यांना जाणून घेण्यास जगत व जन हेच एक पुस्तक. मानवाचे जीवनच एक सुंदर प्रयोग शाळा.

बुध्द-बसव, महवीर यांनी निर्वाण, भक्ति, अहिंसा आदि धार्मिक सत्य जाणण्यासाठी आपले जीवनच एक प्रयोगशाळा बनविले. आपल्या जीवनांत निरंतर परिश्रम करून त्यांनी परम सत्य जाणिले. हा त्यांचा विधायक प्रयोग. रावण, दुर्योधन यांचा विनाशक प्रयोग. त्यांनी काम क्रोधाच्या प्रयोगासाठी आपले जीवनच अर्पिले. आपले अमूल्य प्राण, आपले राज्य त्यांनी बळी दिले. या घटनेवरून जगाचे डोळे उघडले तरी पुरे असे म्हणत; ते मरण पावले. परस्त्री, परधन यांची आशा केल्याने काय होते? त्यांचे जीवनच या प्रश्नाचे उत्तर ठरले. अशाप्रकारे जीवनांत ज्यांनी ठोकर खाल्ली त्यांचे उदाहरण पाहून आपण शिकावे. या दृष्टीने पाहतां जीवनाच्या संघर्षात जे जिंकले-हरले ते सर्वजण आपले गुरूच होत. त्या सर्वांपासून एकेक पाठ शिकावा. आणि आपले सत्य धर्माविषयीचे ज्ञान वृध्दिंगत करून घ्यावे. या विषयी सोमेश्वर कवींचे एक प्रसिध्द वचन आहे

केलवं बल्लवरिंद कल्तु, केलवं शास्त्रंगळं केळुतं
केलवं माळ्वरिंद कंडु, केलवं सुज्ञानदिं नोडुतं
केलवं सज्ञन संगदिंद रियल्, सर्वज्ञनप्पं नरं
पलवुं पळ्ळ समुद्रवै हर हरा श्री चेन्न सोमेश्वरा !

''कांही ज्ञान आपण जाणत्या जनांकडून शिकावे. कांही ज्ञान

आपण शास्त्र श्रवणाने मिळवावे. कांही ज्ञान आपण दुसऱ्यांच्या करण्या वागण्यावरून आणि सुज्ञानाने पाहून मिळवावे. कांही ज्ञान आपण सज्जनसंगाने मिळवावे. अशारीतीने आपण सर्वज्ञ व्हावे. अनेक नद्या नाले मिळून जसा समुद्र बनतो तसे !

या नैसर्गिक धर्माचे प्रथम घटक श्रध्दे विषयी एक आंग्ल संत म्हणतो.

''विश्वास नसेल तर आपण जगणारच नाही''

या विश्वासावर अथवा श्रध्देवर आपले जीवन अवलंबिले आहे. शेतकरी या भूमातेवर केवढी श्रध्दा ठेवतो. मोत्यासारखे शेकडो धान्य कण मातींत घालून हंसत-गात तो घरी परत येतो. माती त्या धान्य कणांना दुप्पट-दसपट-शंभर पटीने आपल्याला परत देईल; असा दृढ विश्वास असतो शेतकऱ्याला. त्याचा हा विश्वास खोटा ठता नाही. वर्षाच्या शेवटी धान्याने त्याचे घर भरून जाते. असा विश्वास मानवावर ठेवून त्याला शेत-घर-धन देऊन पाहा ! अनेक वेळा ते परत येणे दु:साध्य अथवा असाध्य. जीवनावर विश्वास उडाला तर जीवनांत कष्ट नष्ट चुकत नाहीत.

श्रध्देमुळे जीवन मधुर मधाचा प्रवाह बनते. सीता देवि राजकुमारी. मोठ्या सुखांत वाढलेली. सभोवती शेकडो सेवक हात जोडून उभे. तिने पतीबरोबर वनवासांत जाण्याचा निर्णय घेतला. सख्यांनी तिला विचारले, '' सीतादेवी केवढा भयंकर निर्णय तुझा !'' सीतादेवीने दिलेले उत्तर श्रध्देची सुंदर व्याख्या ! ''यत्र राम: तत्र अयोध्या'' जेथे राम तेथेच अयोध्या ! तिच्या दृष्टीने राम नसलेली अयोध्या नगरी घोर अरण्यवत. रामाच्या सानिध्यात अरण्यच तिला अयोध्या-राजवाडा वाटला. किंबहुना तोच स्वर्ग वाटला.

भारतावर ब्रिटीश साम्राज्याचे शासन होते. तेंव्हाची एक घटना एक शाळकरी मुलगा फोनच्या तारा तोडत होता. पोलिसांनी त्याला पकडले. त्या मुलाला विचारले'' काय करतोस?''

''भारत देशाला स्वतंत्र करतो'' बालक म्हणाला.

''या चार तारा कापून देश स्वतंत्र होणार आहे काय?'', पोलिसाने विचारले

''यात काय संशय?'' बालक म्हणाला. पुढे बालकाची श्रध्दा सफळ झाली. देश स्वतंत्र झाला.

सरदार भगतसिंग महान देशभक्त ! त्याच्या रक्ताच्या कणांकणांत देशप्रेम वाहात होते. शृंगार सुखविलासाची स्वप्ने पहाण्याचे त्याचे वय. पण या वयांत तो स्वातंत्र्याचे स्वप्न पहात होता. बलिदानाच्या योजना आखत होता. त्याला फाशी शिक्षा झाली. हंसत हंसत तो मृत्यूच्या कराळ दाढेत शिरला. फांसावर लटकला. त्यावेळी ब्रिटिश अधिकाऱ्यांना त्याने जे सांगितले ते एक सुंदर श्रध्दगीत होय!

''तुम्ही माझा देह ठार माराल. माझा दृढ विश्वास मारूं शकणार नाही. राज्य पालटेल पण माझा विश्वास दृढ राहील.''

भारत देशाला स्वातंत्र्य मिळाले अशा महान श्रध्दावान पुरूषांमुळे. त्यागी जनांच्या त्यागाने. ऐष आरामांत राहणाऱ्या लोकां मुळे नव्हे. त्याग बलिदानाने. मिळवलेले स्वातंत्र्य आपण कशासाठी उपयोग करतां आहांत. पूर्वजांच्या श्रध्दा भक्तीना गौरवाने पाहणे हा आपला धर्म; ही श्रध्दा व्यष्टि आणि समाष्टिचा आधार स्तंभ. सति-पति, पिता-पुत्र, बंधु-मित्र यांमध्ये परस्पर विश्वास असावा. त्यामुळे जीवनांत शांति समाधान ! जीवन नंदनवन होते. हाच आनंद योग !



# ८ श्रध्दाकेंद्र

जीवन समृध्द करण्याचे साधन म्हणजे धर्म ! त्यामुळे तनु-मन, बुध्दि सर्व कांही श्रीमंत ! धर्म जीवनातील दारिद्र्य दुःख यांना दूर ठेवतो. देहाला रोगाची बाधा झाल्यास मानसिक आशा-आकांक्षा अतृप्त राहिल्यास बौध्दिक विचारांचा ताळमेळ चुकल्यास कोणालाही दुःख, वेदना होतात. देहाला सुख-दुःख, वेदना आणि संतोष दोहोंना सहन करण्याचे सामर्थ्य कार्यक्षमता लाभलेली असते. संतोषाप्रमाणेच वेदना सुध्दा आपल्या देहाचा एक अलंकारच. पण ही वेदना अथवा दुःख क्षणिक असावे. संपूर्ण जीवन त्याने व्यापूं नये.

अनवाणी चालतांना आपणांस खडे-कांटे बोचतात. ते कांटे निपटून टाकून आपण विजयी मनोभावनेने पुढे चालावे. हीच जीवन श्रध्दा. धर्म रसायन जीवनांत दुःखच येणार नाही असला कांही चमत्कार करीत नाही. होणारी वेदना आपणांस बाधक होऊ नये . आपण नित्य दुःखी असूं नये. येवढे ते करते. आपले जीवन सुंदर,सशक्त सुदीर्घ करणारी एक शक्ति संजीवनी हे धर्म रसायन.

धर्म रसायनाचे पहिले घटक म्हणजे श्रध्दा ! श्रध्देमुळे आपल्या जीवनांत काय फरक पडतो? एक पाश्चात्य मानस शास्त्रज्ञ सांगतो. ''आपल्या जीवनाचे वैभव आपण स्वतःवर जेवढा विश्वास ठेवतो, त्यावर अवलंबून आहे. पैसा अडका, इत्यादि बाह्यसंपत्तीने लाभणारे हे बाह्य्य वैभव नव्हे. संपद्भरित बुध्दिभावनेला लाभलेले हे अंतरंगाचे वैभव. आपणास चालताना, बोलतांना काम करतांना जीवनांत पदोपदी

नव चैतन्य, चिरोत्साह हा विश्वास आपणांस देतो. त्याने आपले बाह्यांतर जीवन समृध्द सुंदर आनंदपूर्ण! हा विश्वास, ही श्रध्दा आपण कोठे ठेवावी? जीवनांतील श्रध्दा केंद्रे कोणती? याविषयी पाश्चिमात्य अनुभावि चिंतक म्हणतो,

''हे मानवा, तूं आपल्या जीवनांत, तुझ्या शेजाऱ्या-पाजाऱ्यांवर, लहान असला तरी अनंत अशा तुझ्या आत्म्यामध्ये, प्रपंचाचा परमाधार असे जे परमसत्य, त्या परमसत्यावर व परमात्म्यावर विश्वास ठेव!''

आपण आपल्या जीवनावर विश्वास ठेवला पाहिजे. शंभर वर्षाचे समृध्द जीवन जगण्याचा विश्वास आपणांस असावा. जीवनांतील संपूर्ण वैभवाचा अनुभव घेत; आपण जीवन कंठावे. केवळ भिक्षुक होऊन, दुर्बळ होऊन जगूं नये. जीवनांत येणाऱ्या संकटांना हंसत मुखाने सामोरे जाऊन आत्मविश्वासाने, आनंदाने जगावे.

एका वृक्षावर एका पक्षिणीने घरटे बांधले होते. एक छोटेसे पिलू त्या घरट्यांत होते. नुकतेच त्या पिलाने डोळे उघडले होते. उबदार आपल्या पिलाला चारा आणण्यास गेली होती. त्यावेळी एक माणूस तेथे आला. झाडावर चढून त्याने त्या पिलाला घरट्यातून ओढून बाहेर काढले. व आपल्या खिशांत टाकून तो निघाला. पक्षीण आपल्या पिलासाठी चारा घेऊंन आली. पाहते तर घरट्यांत पिलू नाही. ते त्या माणसाच्या खिशांतून किंचाळत होते. त्या माणसाने निष्ठूरपणे त्या पिलाची मान मोडून टाकली देव, धर्म, नीतीशास्त्र यावर अनेक ग्रंथ लिहून स्वर्गाचे स्वप्न पाहणाऱ्या माणसाने त्या येवढ्याशा पिलाच्या भावनांची कदर केली नाही.

पक्षिणीने कांही काळ आपल्या पिलाचा शोध घेण्याचा प्रयंत्न केला. दोन चार आंसू आपल्या पिलासाठी ढाळले. कांही वेळ ती मौन राहिली. आपल्या बंधुबांधवांना गातांना पाहिले. त्यांच्या बरोबर ती

पक्षीण सुध्दां गाऊं लागली.

वृक्षराजाने आश्चर्याने विचारले, ''नुकतेच तूं आपल्या पिलाला गमावून बसलीस. येवढ्यांत ते सर्व विसरून तूं गाते आहेस ? हे कसे बरे?''

पक्षिण म्हणाली, ''वृक्षराज, आम्ही या जगांत जन्माला आलो. कशासाठी? संतोषाने जगण्यासाठी. रडण्यासाठी आम्ही नाही जन्मलो. माझे पंख असे पर्यंत आम्ही आनंदरूपी आकाशांतच विहार करूं ! जोपर्यंत कंठ आहे, तोपर्यंत सुमधुर गीत गाऊं ! ही आमच्या आनंद जीवनाची रीत''

जिवंत असे पर्यत माणसाने कडू- गोड न मानतां जीवनांत येणारे अनुभव स्वीकारून संतृप्तीने रहावे. आपला रंग काळा-सावळा, आपला देह कृश म्हणून वाईट वाटू नये. हत्ती काळा असला तरी त्याच्या येवढा सशक्त प्राणी दुसरा कोणता आहे? बकरी सडपातळ लहानसंर असते. तिच्या येवढा चपळ प्राणी कोणता आहे? जे आहे त्यांतच संतृप्तीने राहणे हीच जीवन श्रध्दा. त्यामुळे जीवनांतील कटुता नाहीशी होऊन गोडी निर्माण होते. अंधार जाऊन प्रकाश येतो. काट्यांतूनच फूल उमलते. जीवन सुंदर व सुमधुर होते. हाच आनंदयोग होय.

माणसाने आपल्या सभोवती असणाऱ्या शेजाऱ्यापाजाऱ्यांवर विश्वास ठेवावा. या जगांत शस्त्रास्त्र हाती न धरतां मी जगूं शकतो असा विश्वास असावा. भीतीच्या छायेत जगणे जीवन नव्हे. परस्परांवर विश्वास ठेवल्याने जीवन आनंद पूर्ण होते. हे श्रध्दाधर्म रसायन होय.

मिहीर सेन हे नाव तुम्ही ऐकले असेल. ते कलकत्याचे एक नामवंत वकील. त्यांना समुद्रांत पोहण्याची आवड. जगांतील एक अवघड अशी ब्रिटन व फ्रान्स यांमधील इंग्लिश खाडी पोहण्यांत ते यशस्वी झाले. पाण्यांत असंख्य जलचर, पर्वतप्राय उंचउंच लाटा, रक्त गोठविणारी थंडी. या सर्वांवर मात करून हंसत खेळत त्यांनी इंग्लिश

खाडी पोहण्याचा विक्रम केला.

आपल्या साहसाविषयी ते म्हणतात. ''माझा दोन गोष्टीवर विश्वास १) कधीही न थकणारे माझे बाहुबल २) सागरांतील जलचरांचा प्रामाणिक कपणा. त्यांनी मला कधी गाठले नाही. कारण ते माझे वैरी नव्हते मीही त्यांचा वैरी नव्हे. जलचर प्राण्यांवर विश्वास ठेवून मिहीर सेन इंग्लिश खाडी पोहण्यांत यशस्वी झाले. आपणसुध्दां आपल्या शेजाऱ्यांवर विश्वास ठेवला तर आपण हा संसार सागर सहज ओलांडू ! हीच जीवनश्रध्दा !

आपण ज्या जगांत जगतो आहोत त्या जगावर श्रध्दा असली पाहिजे. नित्य सूर्य उगवतो जगांतील अंधार नाहीसा करतो. फुले फुलवून सर्वत्र सुगंध पसरवितो. आपले तनु-मन घर उबदार ठेवून जीवनोत्साह वाढवितो.

रात्री चंद्र उगवतो. आपल्या शीतल किरणांनी आपला प्रपंचाचा ताप घालवितो. पाऊस पडतो. पीक येतं. वारा वाहतो. आकाश सर्वांना आश्रय देतो.

या जगांतील सूर्य, चंद्र, पाऊस, वारा यांवर आपण श्रध्दा ठेवली पाहिजे. त्यामुळे आपले जीवन समृध्द निराळ, निराकुल होते.

शेवटी या प्रपंचाचा परमाधार जो परमात्मा परमसत्य त्यावर आपण श्रध्दा ठेवली पाहिजे. घटाला आधार आहे माती. पटाला (पतंगाला) आधार आहे दोरी. तसेच हे जे दृश्य जग आहे, त्याला आधारभूत असा आश्रयदाता परमात्मा आहे. जन्मदाता आपल्या मुलाबाळांचे रक्षण कोठल्याही प्रसंगी केल्याशिवाय रहात नाही. सृष्टिकर्ता परमात्मासुध्दा या प्रपंचाचे या जगाचे सदा रक्षण करतो. हा विश्वासच आपल्या जीवनाचा भक्कम पाया होय. त्यामुळे आपले जीवनरूपी मंदिर भव्य, सुंदर, चैतन्यमय, प्रशांत !

युध्द भूमीवर एक सैनिक लढतो.आकाशांतून शत्रूंची विमाने

घिरट्या घालीत असतात. तोफांचा भडिभार गोळ्यांचा पाऊस, बॉम्ब स्फोट होत असतात. तशा परिस्थितीत सुध्दां जमीनींत खंदक खणून त्यांत दडून राहून

अशोचानन्व शोचत्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।
गतासून् अगतासूंच नानुशोचंति पंडिताः ॥

भगवद्गीतेचे पठण करतो आहे. भगवंतावर केवढी गाढ श्रध्दा ! कोणतीही शस्त्रे आपणांपर्यंत पोहोचंणार नाहीत. तो परमात्मा आपले रक्षण करतो. असा त्याला दृढ विश्वास ! त्यामुळे युध्द भूमीवर सुध्दां तो निश्चिंत. निर्भीत. आपल्या जीवनांतसुध्दां संकटांचा केवढाही बॉम्बस्फोट गोळ्यांचा वर्षाव होवो, तो दयासागर देव नित्य आपले रक्षण करतो, अशी अचल श्रध्दा आपण ठेवावी. त्यामुळे आपले जीवन उज्वल बनते. दिव्य चैतन्य संचरते.

आपले जीवन म्हणचे नंदनवन . ही मरूभूमी ओसाड वाळवंट नव्हे. लग्नाच्या प्रथम दिवसाचा उत्साह जीवनाच्या अखेरी पर्यंत असावा. जीवन म्हणजेच नित्योत्सव आनंदगीत व्हावे. हेच धर्म रसायन हाच आनंदयोग ! त्यासाठी आपण आपल्या जीवनावर जगांवर जगातील माणसावर जगदीश्वरावर अचल श्रध्दा ठेवली पाहिजे. मानवाची श्रध्दा केंद्रे ही. या श्रध्दा केंद्रावर अढळ श्रध्दा ठेवली असतां परम सुख लाभते. हाच आनंदयोग होय.



# ९ सत्य

सत्यप्रज्ञा जागृत करण्याचे साधन म्हणजे धर्म ! आपले वागणे, बोलणे, भाव, बुध्दि यांत धर्म भरलेला असेल तर सत्यप्रज्ञा जागी होते. त्यामुळे जीवनांत आनंदरस वाहूं लागतो. हाच आनंदयोग होय. धर्म रसायन पानाचे ते अमृत फल. या धर्म रसायनाचे प्रथम घटक म्हणजे श्रध्दा होय. याविषयी ज्येष्ठ जर्मन पदार्थ विज्ञानी, गणितज्ञ माक्स फ्लांक म्हणतो,

'' श्रध्दा हा जो सद्‌गुण आहे, त्याविषयी कोणत्याही शास्त्रज्ञाचे दुमत नाही !''

''विज्ञान श्रध्दा अथवा विश्वास यांचा विरोध करते'' असे सामान्य लोक समजतात.

''श्रध्दा नसेल तर शास्त्रज्ञाचे संशोधन चालणार नाही'' ही सत्यस्थिती !

''ही भूमि, चंद्र, सूर्य आदि ग्रह नक्षत्रे आपणांस फसवत नाहीत हे सर्व 'विश्व नियति' सोडत नाहीत.'' या विश्वासावरच विज्ञान उभे आहे. उदा.हैड्रोजनचे दोन अणु व ऑक्सीजनचा एक अणु एकत्र आल्याने ($H_2O$) पाणी निर्माण झाले. या नियमाचे उल्लंघन पाणी कधीही करीत नाही. या विश्वासावरच शास्त्रज्ञ संशोधनांत मग्न होतो. विज्ञानाच्या विशाल प्रगतीला तो कारणीभूत होतो. अशाप्रकारे निसर्गावर विश्वास ठेवतो; तो विज्ञानी; परम सत्य, परम आत्म यावर विश्वास ठेवतो तो आत्मज्ञानी.

हे विश्व अत्यंत विशाल ! या विश्वांत अनेक गहन गंभीर सूक्ष्मातिसूक्ष्म विषय आहेत. ते सर्व विषय जाणून घेणे मानवाला असाध्य. त्यामुळे आपणाला जेवढे समजले तेवढेच हे जग आहे; असे समजणे चुकीचे ठरते. आपणांस माहित नसलेले विषय आहेत; या प्रपंचाला आधारभूत अशी जी सत्यवस्तु, ती वस्तु आपणांस दिसत नाही, कळत नाही; तरी पण अशी सत्य वस्तु आहे असा जो भाव; त्यालाच श्रध्दा म्हणतात. या परम सत्य परमात्म्याच्या अस्तित्वाविषयीं महात्मा बसवेश्वर म्हणतात,

**उदकदोळगे बयचिट्ट बयकेय किचिनंतिद्दित्तु**
**ससियोळगण रसद रूचियंतिद्दित्तु**
**ननेयोळगण परिमळदंतिद्दित्तु**
**कन्येय स्नेहदंतिद्दित्तु !**

महात्मा बसवेश्वरांनी देवाला कूडलसंगमदेव असे नांव दिले. किती सुंदर नांव ! हे जगत आणि हे जन जेथे जाऊन परस्परांना मिळतात...परस्परांत विलीन होतात. समरस होतात, तो संगम. असंख्य जीवरूपी नद्या आपली वेगवेगळी नाम रूपे टाकून सत्य रूपी सागरांत विलीन होतात. तो महासत्य सागरच परमात्मा होय ! तो कूडलसंगमदेव ! देवाचे अस्तित्व महात्मा बसवेश्वर एक दोन दृष्टांताद्वारे स्पष्ट करतात.

**उदक दोळगे बयचिट्ट बयके किचिनं तिद्दित्तु**
**पाण्यात दडून बसलेली इच्छा अग्नीप्रमाणे**

पाण्यात आग दडलेली आहे. पण ती आपणांस दिसत नाही. समुद्रांतील पाण्याची खोली सात ते आठ किलो मिटर आहे. त्याच्या खाली तीस ते चाळीस किलोमिटर खोलीवर लावारस आहे. धगधगती आग. कधी कधी ज्वालामुखीच्या रूपाने ही आग बाहेर पडते. नाहीतर समुद्र कसा थंड...शांत...भासतो. भूमिसुध्दा शांत वाटते . आपण त्या

भूमीवरच जगतो. पण आमच्या पायाखालील धगधगत्या आगीचा अनुभव आपणांस होत नाही. त्याचप्रमाणे परम सत्याच्या आश्रयांतच आपण जगतो. पण आपण त्या परम सत्याला पांहू शकत नाही.

ससियोळगण रसद रूचियंतिद्वित्तु

रोपामधील रसाच्या रूचिप्रमाणे

उसाचा रस अत्यंत गोड. त्यापासूनच साखर होते. उसाची कांडी जमीनीत पेरून पाणी पाजल्यानंतर रोप उगवते. त्या रोपामध्ये पानांमध्ये...कांडीमध्ये उसाच्या रसाची गोडी नसते. तेथे कोठेही साखरेचा अंशसुध्दा आढळत नाही. पण त्या रोपाला आठ दहा महिने वाढविले तर त्या उसामध्ये गोड रस भरून राहतो. त्या रोपामध्ये रसाची गोडी अव्यक्त रूपाने असते. उसामध्ये ती गोडी व्यक्त होते. या प्रपंचात परमात्मा अव्यक्त रूपाने असतो. परमार्थांत श्रध्देच्या डोळ्यांना तो व्यक्त होतो.

ननेयोळगण परिमळदंत्तिद्वित्तु

कळ्यांतील परिमळाप्रमाणे

मोगऱ्याची कळी सुगंध रहित असते. दुसऱ्या दिवशी सकाळी सूर्य किरणांचा स्पर्श होतांच ती कळी उमलते. सर्वत्र फुलाचा सुगंध पसरूं लागतो. दूर दूर हून भ्रमर तिकडे धांव घेतात.

या जगाच्या कणाकणामध्ये सत्याचा सुगंध भरला आहे. ज्ञानाचा अरूणोदय होतांच श्रध्देचे डोळे उघडतांच हा सत्य रूपी सुगंध अनुभवाला येतो.

कन्येय स्नेहदंतिद्वित्तु

कन्येच्या स्नेहाप्रमाणे

लहानशा बालिकेमध्ये मातृवात्सल्य सुप्तपणे असते. बालवयांत ते व्यक्त होत नाही. ती बालिका वयांत आल्यावर, ती स्वत: एका बालकाला जन्म दिल्यानंतर मातृवात्सल्याचा जणूं महापूर येतो. हे

मातृवात्सल्य अंगाई गीताच्या रूपाने...बालकाचे चुंबन घेण्याच्या क्रियेमध्ये....त्या बाळाशी बोबड्या स्वरांत बोलण्याच्या रूपाने व्यक्त होते.

मातेच्या त्या परम वात्सल्यरूपी गंगेचे आकंठ पान करून शिशू वाढतो...मोठा होतो. मातृवात्सल्याची ती जणू जिवंत साक्ष ! दैवी प्रेमासमानच हे परमपावन मातृवात्सल्य लहानशा बालिकेंत असते. अव्यक्त रूपाने. त्याप्रमाणे परमसत्यरूपी परमात्म्याचे कारूण्य या जगाच्या कणाकणांत ओतप्रोत भरून राहिले आहे. आपल्या चर्म चक्षूंना ते दिसत नाही.

सागरांत दडून राहलेला वडवाग्नि, उसाच्या रोपामधील साखर, कळ्यामधील सुगंध बालिकेमधील मातृवात्सल्य हे व्यक्त रूपांत नाही. त्याप्रमाणे या जगांत ओतप्रोत भरून राहिलेले परम सत्य आपल्या डोळ्यांना दिसत नाही. म्हणून ''सत्य नाहीच !'' असे आपण ठामपणे म्हणूं शकत नाही.

''सत्य आपणांस दिसत नाही, ते कदाचित असेलसुध्दा ! असे आपण म्हणावे. अनेक साधुसंतांनी, शरणांनी, श्रध्देच्या डोळ्यांनी त्या परम सत्याचे दर्शन घेतले आहे; हे आपण विसरूं नये.

सुमारे अडीच हजार वर्षापूर्वी भारतांत ज्ञान शांति, समाधानाचे एक सुंदर कमळ उमलले. भगवान बुध्दाच्या रूपाने ! आज सुध्दा त्या महापुरूषाचे ज्ञान, शांति सुगंध, समाधानाचा मकरंद या देशांत दरवळतो आहे. त्याचे हृदय मधुर, मन परिशुध्द, बोलणे गोड, नेत्र प्रशांत, सत्य दर्शनांत बुध्दाचा उपदेश निर्णायक ! संपूर्ण देशभर बुध्दाविषयी आदर भाव !

एक विद्वान बुध्दाच्या दर्शनाला आला. बुध्द एका वृक्षाखाली बसला होता. त्याच्या समोर संघ बसला होता. बुध्दाचा शांत शीतल उपदेश सुरू होता. आगंतुक विद्वान म्हणाला, ''मी एक सिध्दांत मांडणार

आहे'' ''मांडा !'' बुध्द म्हणाला.

त्या विद्वानाने तासभर ''देव आहे'' या विषयावर भाषण केले. आपले भाषण संपल्यानंतर त्याने बुध्दाला विचारले, ''कसे होते माझे भाषण? माझा सिध्दांत बरोबर आहे ना?''

बुध्दाने फक्त मंद स्मित केले. त्यांनतर तो विद्वान निघून गेला. कांही वेळाने दुसरा एक विद्वान तेथे आला त्याने ''देव नाही'' असा सिध्दांन्त मांडला. बुध्दाने शांत-प्रशांत चित्ताने ते ही ऐकून घेतले. शेवटी त्या विद्वानाने प्रश्न केला, ''मी मांडलेला सिध्दान्त बरोबर आहे ना?'' तेव्हासुध्दा बुध्द कांही बोलला नाही. मंदस्मित केले. आणि तो शांत राहिला.

बुध्दाचा परम शिष्य आनंद या घटना बारकाईने पहात होता. त्याने तो दुसरा विद्वान गेल्यावर बुध्दाला विचारले, ''गुरूदेव, आपण त्या दोघाही विद्वानांनी मांडलेले सिध्दांत 'देव आहे' आणि 'देव नाही' ऐकून घेतले. आणि आपली मौन संमति दिली. हे बरोबर आहे काय?''

बुध्द म्हणाला, ''मी कोणाचाही सिध्दांत बरोबर आहे; किंवा चूक आहे; असे म्हटले नाही. मी फक्त मौन धारण केले होते.''

बुध्दाच्या दृष्टीने सत्य आहे अथवा सत्य नाही याचा निष्कर्ष डोक्याने...विचाराने अथवा वादविवादाने होणार नाही. सत्याचा अनुभव हृदयत: अनुभवाला यावा. आनंद प्राप्त व्हावा.

गणितामध्ये बिंदू सिध्दांत फारच सुंदर आहे. व्याख्येप्रमाणे लांबी, रूंदी जाडीही ज्याला नाही त्याला बिंदु म्हणतात. तो डोळ्यांना दिसत नाही. आपण एक वर्तुळ काढले तरी त्याला केंद्र बिंदु आहे. पण त्या बिंदूला लांबी, रूंदी, जाडी सर्व कांही आहे. हा बिंदु खऱ्या बिंदूचा संकेत मात्र. खरा बिंदु डोळ्यांना दिसला नाही तरी त्या सिध्दांताच्या आधाराने काढलेले वर्तुळ आपणांस दिसते. त्याप्रमाणे या विश्वरूपी वर्तुळाला केंद्र रूपी परम सत्य बिंदु आपल्या डोळ्यांना दिसला नाही

तरी तो आहेच. ते महासत्य जाणून घेण्यास आपले श्रध्दारूपी नेत्र उघडले पाहिजेत.

थॉमस अल्वा एडीसन बालपणी शाळा शिकण्यात रस घेत नसे. त्याला शिक्षकांनी शाळेतून हांकलून लावले. त्याला शाळेतून घरी आणायला गेलेली त्याची माता शिक्षकांना म्हणाली,

''महाशय, ज्याला आपण शाळेतून हांकलून लावत आहांत, तो माझा पुत्र उद्या जगप्रसिध्द शास्त्रज्ञ होणार आहे. यांत कसलीच शंका नाही. तुम्हीसुध्दा ते पहालच'' आणि खरोखर एडीसन मोठा झाल्यावर संशोधनांत गुंतला. त्याने शेकडो शोध लावले. तो जगप्रसिध्द विज्ञानी झाला. त्या बालकामध्ये सुप्त रूपाने असलेला विज्ञानी, शिक्षकांना ओळखता आला नाही. मातेच्या श्रध्दा नेत्रांना तो दिसल्याशिवाय राहिला नाही.

महात्मा गांधीजींनी ''अहिंसेने या देशाला स्वातंत्र्य मिळेल'' असे सांगितले. अनेक नेत्यांनी गांधीजीना विरोध केला. साऱ्या जगावर राज्य करणाऱ्या ब्रिटीशांशी अहिंसेच्या शस्त्राने लढून कसे बरे स्वातंत्र्य मिळेल असे त्यानां वाटले. गांधीजींना मात्र आपल्या सिध्दांतावर गाढ श्रध्दा होती. त्यांनी वादविवादात न पडतां आपल्या अहिंसा मार्गात मोठ्या श्रध्देने मार्गक्रमण करायला सुरवात केली. अनेक वेळां जेल यात्रा करावी लागली. ब्रिटिशांच्या दडपशाहीला तोंड द्यावे लागले. नंतर सारा देश गांधीजींच्या पाठीशी उभा राहिला. ''चले जाव'' चळवळ सुरू झाली. 'जेल भरो ' आंदोलन उभे राहिले. ब्रिटिश सत्ता हादरून गेली. एक ब्रिटिश अधिकारी म्हणाला,

''आम्ही जगांतील कोणत्याही मारक अस्त्राला तोंड देऊ शकतो. पण हंसत मुखाने हात जोडून...नि:शस्त्र होऊन समोर येणाऱ्या गांधीजींच्या समोर उभे राहूं शकत नाही''

साऱ्या जगांत प्रथम अहिंसा अस्त्राचा प्रयोग राष्ट्र पातळीवर

करून देशाला स्वातंत्र्य मिळवून देणारे महापुरूष म्हणजे गांधीजी ! अहिंसेच्या प्रेमळ अस्त्रामध्ये जी प्रचंड शक्ति आहे, ती गांधीजीनांच ओळखतां आली. कारण त्यांचे श्रध्दा नेत्र पूर्ण पणे उन्मलित झाले होते. असे श्रध्दा नेत्र ज्याला लाभले, तो साधकच परम सत्य पाहूं शकतो !



# १० श्रध्दा सामर्थ्य

जगातील अनेक सत्य शोधक...साधक...चिंतक आनंदाविषयी चिंतन करतात. आपल्या जीवनामध्ये त्या आनंदाची अभिव्यक्ति करतात. त्यांची आनंदाविषयी जी कल्पना आहे, ती आपल्या कल्पनेहून वेगळी आहे. भौतिक समृध्दिमुळे जीवन आनंदपूर्ण होते, असे आपण समजतो. जगांतील विविध जनांगांचे अध्ययन केलेला गिल् हेबार्ड म्हणतो,

''गरीबी अथवा श्रीमंती दोन्ही मानवाच्या जीवनांत आनंद निर्माण करण्यांत विफल झाली आहेत.''

गरीबांच्या जीवनांत आनंद नसतो असे म्हटले तर श्रीमंतांच्या जीवनांत सुध्दा आनंद आहे; असे कोठे आहे? श्रीमंतांच्या जीवनांत आनंद नसतो, असे म्हटले तर गरीबांच्या जीवनांत आनंद आहे; असे नाही. एकंदरीत गरीब आणि श्रीमंत दोन्ही वर्गाचे लोक आनंदापासून वंचित आहेत. त्यामुळे आनंद हा संपत्ति असण्यावर अथवा नसण्यावर अवलंबून नाही. संपत्ति आणि संतोष यांचा सीधा सरळ संबंध जोडतां येत नाही.

एक कवि राना-वनांतून चाललेला असतो. वाटेत झुळुझुळु वाहणारे झरे, हिरवीगार वनश्री, वसंत ऋतु. वन बहरलेले. रान फुलांचा सुगंध वाऱ्याच्या झुळुकीबरोबर वाहात येतो आहे. पोपट मैना मंजुळ स्वरांत कलरव करीत आहेत. वातावरण प्रशांत..या सर्वांचा अनुभव घेत कवि देहभान विसरतो. त्याच्या डोळ्यांत हिरवीगार वनश्री भरून

राहते. कानांत झऱ्यांचे झुळुझुळु वाहणे आणि पक्षांचा कलरव... मनांत संगीताच्या लहरी... हृदयात संतोष... कवि आनंद साम्राज्यांत प्रवेश करतो. गरीबी आणि श्रीमंती याचे सीमोल्लंघन करतो.

एक गरीबाची झोपडी. त्या झोपडीत एक माता आणि बालक. त्या बाळाचा पिता मजूरी करायला बाहेर गेलेला असतो. त्याला दिवसभराची शिदोरी चार भाकऱ्या बांधून पाठवते. ती स्वत: दोन भाकऱ्या हातांत घेऊन खात असते. अंगावरील कपडे फाटके, मळके. त्या कपड्यांवर ती बाहेर येऊं शकत नाही. ती झोपडीतच स्वत:ला कोंडून घेते. तिच्या मांडीवर मूल खेळत असते. मातेचे मुख पाहून बाळ हंसत असते. बाळाचे मुख पाहून माता हंसत असते. त्या बाळाचे मंदहास्य मातेच्या डोळ्यांत भरून ओसंडत आहे. त्या गरीब झोपडीत संतोषाचा स्वर्गच अवतरतो.

श्रीमंत माता आपल्या बाळाला सोन्याच्या पाळण्यांत झोपवीत असेल. ती गरीब माता फाटक्या कपड्यांच्या झोळीत आपल्या बाळाला झोके देत असेल; पण श्रीमंत मातेच्या आनंदाहून त्या गरीब मातेचा आनंद कांकणभर सरस नाही का?

जीवनांतील आनंद हा संपत्ती असण्यावर अथवा नसण्यावर अवलंबून नसतो. माणसाने गरीब आणि श्रीमंती दोन्ही विसरावे. आपल्या हृदयांत नैसर्गिक सहज प्रेम भरून घ्यावे. तेंव्हा जीवनांत आनंदाचा झरा वाहूं लागतो. हाच आनंदयोग होय. अशा आनंदपूर्ण जीवनासाठी माणसाने अन्यासक्ति टाकून द्यावी. परम सत्यामध्ये आसक्ति ठेवावी. धर्म मार्ग अनुसरावा. धर्म रसायनाचा पहिला घटक श्रध्दा ! या श्रध्देचे स्वरूप काय? सामर्थ्य किती?

''श्रत् इति सत्यं तद् धारिका मति: श्रध्दा'' सत्यग्रहण करणारी निर्मळ मति म्हणजेच श्रध्दा. आपल्या सामान्य दृष्टीला, मनाला, मतीला न गवसणारे सत्य त्या निर्मल मति श्रध्देला सहज गोचर. जीवनांत

सहजपणे अनेक गोष्टी दिसतात. पण परम सत्य सहजासहजी दिसत नाही.

सणाच्या दिवशी शिव, पार्वती, गणपती, मारुती, विष्णु इत्यादि मातीच्या मूर्ति तयार करतात. त्या विकत घेणाऱ्याला मूर्तीमध्ये शिव-पार्वती इत्यादि मूर्ति दिसतात. त्या मूर्तीना आधारभूत माती दिसत नाही.

''या शिवाची किंमत किती? विष्णुची किंमत किती?'' असे चौकशी करतात. शिवाला अथवा विष्णूला चार पैशांत खरेदी करतां येईल काय? ते विकत घेतात माती; याची खात्री असूनही ते त्यांना दिसत नाही. हा लौकिक सत्यच आपणांस दिसत नाही. तर मग अलौकिक सत्य कसे दिसेल?

आपण बारा ज्योतिर्लिंगाचे दर्शन घेतले असे म्हणतो. पण त्या बारा ज्योतिर्लिंगामध्ये असणारी वस्तु एकच आहे; हे विसरतो. ''ज्योतिरेव लिंग:'' ज्योति...परंज्योति म्हणजे लिंग, देव; हे आपण विसरतो. काशीला जाऊन परत आल्यावर तेथील देवालयांत पवित्र ज्योति दर्शन घडले असे तो यात्रिक सांगतो. ग्रामस्थ काशी ज्योतिर्लिंगाचे दर्शन घेणारा पुण्य पुरुष म्हणून त्याचा भव्यसत्कार करतात. गळ्यांत हार घालून, शाल-श्रीफळ-महावस्त्र देऊन मोठा सन्मान करतात.

समारंभ संपल्यानंतर एका वृध्दाने त्या यात्रिकाला विचारले, ''काशी विश्वेश्वराच्या मंदिरात तूं ज्या ज्योतीचे दर्शन घेतलेस ती ज्योति कशी आहे?''

''आपल्या घरांत जशी ज्योत असते, तशीच ज्योत तेथेही असते'' यात्रिक म्हणाला.

''तसे असेल तर तू विशेष असे काय पाहिले. आपल्या गावातील देवळांत जशी लिंगमूर्ति असते, तशीच लिंगमूर्ति काशी विश्वेश्वराच्या मंदिरात आहे...आपल्या घरांत जशी ज्योति

असते..तशीच ज्योति काशीमध्ये... तर मग तुझा सत्कार समारंभ कशासाठी?'' वृध्दाने विचारले.

''मलाही समजले नाही'' यात्रिक म्हणाला.

पाहणारे डोळे असतील, श्रध्दा असेल तर आपले घरच काशी. आपल्या घरातील पाणीच पवित्र गंगाजल !

महात्मा गांधी शिमोगा येथे अधिवेशनासाठी आले होते. बहुतेक सर्व राष्ट्रीय नेते त्या अधिवेशनाला आले होते. तेथून जवळच जोग जलपात बघायला सर्व नेते निघाले. गांधीजीना एका नेत्याने म्हटले,

''बापूजी आपणसुध्दां या ना ! सुमारे आठशे फुटांवरून कोसळणारा हा जलपात मोठा रूद्र रमणीय आहे. आपण तो अवश्य पहावा.''

गांधीजी म्हणाले, ''आपण अवश्य तो जलपात पाहून या.''

''तुम्ही येणार नाही काय?'' एका नेत्याने विचारले

''मी याहून उंच आणि भव्य जलपात पाहिला आहे'' गांधीजी म्हणाले.

आपल्या देशांत हाच भव्य जलपात. याहून भव्य जलपात कोणता आहे?'' नेत्याने विचारले.

गांधीजी म्हणाले, ''याच देशांत याहून भव्य जलपात मी पाहिला आहे. तुम्हीसुध्दा तो पाहिला आहे.''

''असा कोणता जलपात आहे बरे?'' सर्वांनी आश्चर्याने विचारले.

''उंच आकाशतून धाराकार कोसळणारा पाऊस म्हणजेच तो श्रेष्ठ जलपात!'' गांधीची हंसत म्हणाले. गांधीजींची ज्ञान दृष्टी आणि श्रध्दा पाहून सर्वजण मूक झाले.

आपल्या जीवनांत पावला पावलाला परम सत्य ओळखून त्या सत्याचे दर्शन घडविणारी विशेष मति, ज्ञान नेत्र म्हणजेच श्रध्दा ! हे जग

हे जन कसेही असले तरी स्वर्ग, सदृश्य जीवन म्हणजे आनंदाचा सागर हे ओळखणे हेच श्रध्देचे स्वरूप-सामर्थ्य.



# ११ प्रभव

सत्यज्ञानाने जीवन आनंदपूर्ण होते. त्यासाठी आपले श्रध्दारूपी डोळे उघडले पाहिजेत. केवळ चर्म चक्षूंनी या जगाकडे पाहिल्यास सत्य वेगळेच असते. आणि आपण वेगळेच समजतो. श्रध्दा एक विशेष बौध्दिक सामर्थ्य. ज्ञानचक्षु अथवा आंतरचक्षु उघडले तर न दिसणारे सत्य दिसूं लागते.

हे एक झाड आहे. या झाडाला पाहायला कांही विश्व विद्यालयाची पदवि घ्यायला नको की हिमालयात जाऊन तप करायला नको . मंत्र-तंत्र शिकायला नको. डोळे उघडले की पुरे. ते झाड आपणास दिसते. सत्य-देव सर्वव्यापी असतो. पण आपले श्रध्दा नेत्र उघडल्याशिवाय तो दिसत नाही. परवस्तु परमात्मा. त्याला सत्य असे तात्विक नांव. देव हे धार्मिक नांव. दोन्ही एक होऊन तो सत्यदेव.

दिव्यते इति देव: ।

जो साऱ्या जगाला प्रकाशमान करतो तो देव ! आपण सूर्याला शोधायला नको . आपण जेथे आहोत तेथेच डोळे उघडले तरी पुरे. तो दिसतो. आपल्या ज्ञानाचे डोळे उघडतां क्षणीच तो सत्यदेव आपोआप दिसूं लागतो.

सत्यदेवाला पहायला आपण कोणतीही साधना तपस्या, युक्ति, शक्ती करायला नको. आपले अंत:चक्षु नीट पणे उघडले पाहिजेत: पुष्कळ वेळा आपले डोळे उघडलेले असतात, पण समोर असणारी

वस्तु अपाणांस दिसत नाही. कारण येवढेच की आपण खरोखर डोळे उघडलेले नसतात. डोळे उघडल्याप्रमाणे भास होतो. उदा. एक तरूण सिगारेटचे पांकीट हाती घेऊन त्याकडे पाहतो. त्यावर छापलेले असते.

''धूम्रपान हे आरोग्याला घातक''

तो ते पाहतो, वाचतो आणि सिगारेट ओढतो. याचा अर्थ छापलेले नीटपणे त्याने पाहिले नाही. होय ना?

लोक देवालयां्त जाऊन घरी येतात. ''आपल्याला देवदर्शन घडले'' असे सर्वांना सांगतात. खरोखर देवदर्शन घडले असते तर ते परत घरी आले असते का? माया प्रपंचात...मोहाच्या संसारात परत आले असते का? आयुष्यभर केलेल्या सकल साधना, पुराण प्रवचन ऐकणे, सांगणे, धर्मशास्त्र पठण करणे; कशासाठी? देव दर्शनासाठी. जीवनांतील हे श्रेष्ठ ध्येय गाठल्यानंतर...सत्यदेवाचे दर्शन घडल्यानंतर कोणीतरी परत मिथ्या प्रपंचाकडे वळेल काय? प्रपंचाकडे वळत असेल तर त्याला देवदर्शन घडले नाही. देवदर्शन घडल्याचा भास झाला. असाच त्याचा अर्थ नव्हे काय?

आपल्या देवामध्ये पूर्वेकडचे देव वेगळे. पश्चिमेकडचे देव वेगळे. त्यामध्ये आपले देव श्रेष्ठ ! दुसऱ्यांचे देव कनिष्ठ हा वाद ! कांही देव जागृत तर कांही देव अजागृत असाही एक संघर्ष आहेच. म्हणजे कांही देव झोपलेले असतात कांही देव झोपलेले नाहीत असा अर्थ होतो. देव कधीतरी झोपतो का? जागा होतो का? त्रास देतो का? भक्ताकडे मागतो का? श्रध्देचे नेत्र उघडल्यावर...सत्यदेव दर्शन घडल्यावर धार्मिक क्षेत्रांतील हा वाद-विवाद...अंधश्रध्दा वगैरे सर्व कांही नाहीसे होते.

आपल्यापैकी अनेकजण श्रध्देचे डोळे उघडण्याचा प्रयत्न करीत नाहीत. डोळे उघडून पहायलसुध्दा थोडीशी साधना करावी लागते ना?

एक माता होती. तिचे एक मूल होते. त्या मुलाला दोन तीन वर्षे झाली; तरी त्याला उभे राहतां...चालतां येत नव्हते. मातेने मुलाला ते शिकविले नव्हतेच. मुलाला काय हवे; ते खायला घालून; ते जसे वाढेल तसे त्याचा पाळणा मोठा करीत गेली. त्या मुलाला तिने पाळण्यातून उतरविले नव्हते.

एकदा त्या मातेला परगांवी जावे लागले. आपल्या आवडत्या लेकराला तिने आपल्या सखी शेजारणीकडे सोपविले. पहिल्या दिवशी त्या शेजारणीने स्वयंपाक केला. मुलाने पाळण्यातूनच जेवण मागितले. शेजारणीने त्या मुलाला, ''पाळण्यातून उतरून खाली ये'' असे सांगितले.

''खाली कसे उतरायचे?'' मुलाने विचारले.

''कां, तुला पाय नाहीत काय?'' शेजारणीने विचारले.

''कोठे आहेत?'' मूल म्हणाले.

कांही वेळानंतर भूक सहन न झाल्याने आपणच पाळण्यातून खाली उतरून आले. एकेक पाऊल टाकीत स्वयंपाक घराकडे आले. ''आपणास पाय आहेत. आपणांस चालता येते'' हे पाहून त्या मुलाला फारच आनंद झाला. आश्चर्य ही वाटले. परगांवी गेलेली माता परत येईपर्यंत मूल घरभर, आंगणभर दुडुदुडु धांवत होते. ते पाहून मातेला अपार आनंद झाला. याजन्मी आपणांस चालता येणारच नाही; असे समजलेल्या त्या मुलाला जणूं घरात स्वर्गच अवतरला होता.

श्रध्देचे नेत्र उघडून धर्म पथांत चालायला शिकले तर सत्य-देवाचे दर्शन !

श्रध्दचे डोळे उघडायला शब्द-चिंतन एक सुंदर साधन ! 'प्रभव:' हा एक शब्द. याचा अर्थ जन्म अथवा मूल कारण. या शब्दाचे चिंतन करीत त्याचा रसास्वाद करीत आपण त्या शब्दामागोमाग जावे. कोणतीही वस्तु पाहिल्यावर त्याचा प्रभव अथवा मूळ शोधीत जावे.

एकाचे मूळ दुसऱ्यात होत जाते. तसेच आपण या प्रपंचाचे मूळ शोधत गेलो तर आपण त्या परम सत्याच्या समीप जाऊन पोहोचतो. समस्त जग त्या मूल सत्यातून उत्पन्न होते. हेच त्या जगाचे प्रभव: !

आकाशांतून पावसाच्या पाण्याचा एक थेंब आपल्या हातावर पडतो. आपण त्या थेंबाला विचारावे, ''तुझे मूळ रूप कोणते?'' ''मेघ माझे मूळ'' तो थेंब सांगतो. ''तुझे मूळ कोणते?'' असे त्या निळ्या मेघांना विचारावे. ''महासागरच माझे मूळ'' असे तो मेघ सांगतो. त्या सागराचे मूळ विचारूं गेल्यास ;तो महामौन धारण करतो. नि:शब्द होतो.

मंदिरात एक देवाची सुंदर शिलामूर्ति आपण पहातो. त्या शिलामूर्तिला आपण विचारावे ''तुझे मूळ काय?'' ''पर्वत माझे मूळ'' ती शिलामूर्ति सांगते. पर्वताला विचारल्यास ;ही भूमी माझे मूळ ;असे तो पर्वत सांगतो. भूमीला विचारल्यास ''सौर मंडल माझे मूळ'' असे भूमि सांगते. तुझे मूळ काय? असे सौरमंडलाला विचारतां, ''विशाल आकाशच माझे मूळ'' असे सौरमंडल सांगते. त्या आकाशाला हाच प्रश्न विचारला तर तो महामौन धारण करतो नि:शब्द ब्रह्म...सत्य-देव असे सूचित करतो.

आपण पाहिलेली मूर्तीच धरून आपण राहूं नये. त्यामुळे आपली देव मूर्ति श्रेष्ठ ! तुमची देव मूर्ति लहान अशा वाद-विवादाला तोंड फुटते. ती मूर्ति अथवा त्या वस्तुचे मूळ कशांत आहे? याचा विचार करीत आपण मागे-मागे जावे. कोणता तरी एक सुवर्ण क्षण येतो. तेव्हा आपणांस सत्य-देवाचे दिव्य दर्शन घडते.!

कांही देवता मूर्ति सोन्या-चांदीच्या बनविल्या जातात. एक देव मूर्ति एक किलो सोन्याची होती. त्या देव मूर्तीचा भक्त सांगत असे, आमच्या देवाची किंमत पाच लक्ष रूपये. विशाल विश्व त्या सत्यदेवरूपी सागरांतील एका तरंगाप्रमाणे अशा त्या भगवंताची किंमत केवळ पाच

लक्ष रूपये? त्या देवतामूर्तीला अभिषेक अर्चन अर्पण करून विचारावे तुझा प्रभव:? तेंव्हा ती मूर्ति आपले मूळ रूप, आपले मूल्य, महासत्य सांगितल्याशिवाय राहणार नाही. घर-दार, धन कनक, सति-सुत, बंधु-मित्र यांनी हा मोह-प्रपंच निर्माण झाला. त्या प्रपंचाला सुध्दा विचारावे, ''तुझा प्रभव कोणता?'' तेव्हा तो सारा प्रपंच नाहीसा होतो. परम सत्यदेवाचे दर्शन! परमानंद! हाच आनंद योग!



# १२ श्रेष्ठ

तैत्तरीय उपनिषदांत एका ऋषीची गोष्ट. त्याचा शिष्य मोठा गुरूभक्त. त्याने एके दिवशी आपल्या सद्‌गुरूपाशी आपली इच्छा व्यक्त केली.

''गुरूदेव, मी ऋषी व्हावे. मला सत्यदर्शन व्हावे. त्यासाठी एक साधन मला सांगा !''

गुरूने शिष्याला उपदेश केला, ''घरदार, सति-सुत, धन-कनकादींचा व्यामोह माणसाने सोडावा. तनु-मन-बुध्दी आदींना विसरावे. स्वत:च्या आत्म्याला जाणून घ्यावे. हा स्वाध्याय. असे आत्मज्ञानी महापुरूषच साधु-संत-शरण ! अनुभावि ! त्यांचे उपदेशामृत म्हणजेच प्रवचन. ते प्रवचन ऐकणे, श्रवण करणे, हाच सत्संग. या सत्संगाने सत्यदर्शन !

बाराव्या शतकांत बसवादि शिवशरणांनी स्वाध्याय प्रवचन रूपी शिवानुभव नित्य चालविला. आपापला जीवनोपाय जो उद्योग, कायक करून दररोज संध्याकाळी खुल्या अनुभव मंडपात जमत. अल्लम प्रभु देवांनी एक महान तत्व सांगितले. बसवण्णांनी कांही भक्ति सुमने अर्पिली चेन्न बसवेश्वरांनी चिन्मय ज्योत पाजळली. सिध्दरामेश्वरांनी कर्मयोग सांगितला. अक्कमहादेवीने विरक्तीची मौक्तिक वाणी उच्चारली. अन्य शिवशरणांनी कायकाची महिमा वर्णिली. शिवानुभवाच्या त्या मंगलमय उपदेशाचे श्रवण करणाऱ्या लोकांच्या जीवनात अगाध परिवर्तन घडले. त्यांच्या हाती सत्य-शुध्द कायक (उद्योग) मनांत देवाचे स्मरण.

बुध्दीमध्ये सुज्ञानाचा प्रकाश. हृदयांत परिशुध्द प्रेम ! एकंदरीत त्यांचे जीवन राग-द्वेष, आपला परका हा भेदभाव रहित होऊन परमानंद सागर झाले. हेच सत्संगाचे सुमधुर फल होय.

सत्संगामध्ये शब्द कमी. अर्थानुभव अधिक. श्रवण केलेला शब्द मनाला स्पर्श करावा. हृदयाला जाऊन तो शब्द भिडावा. त्या शब्दावर निरंतर बुध्दीमध्ये चिंतन-मंथन व्हावे. तेव्हां जीवनांत सत्य शिव प्रकाश पसरतो. हे खरे स्वाध्याय प्रवचन.

अल्लम प्रभुदेव म्हणतात

ताळमरद मेलोंदु भावि इद्दितल्ला
आ भाविय तडिय हुल्लनोंदु मोल बंदु मेयित्तला
कायसहित जीव बाणस माडलरियरु
गुहेश्वरा, निम्माणे !

देह म्हणजे चांगले पोसलेले ताडाचे झाड. त्या झाडावर मन हीच एक खोल विहीर. त्या विहिरीच्या कडेला विषयरूपी हिरवे गवत. जीव हाच ससा. शब्दादि विषय रूपी गवत चरतांना हा ससा देहभान विसरला आहे. काळरूपी व्याध आपल्या पाठीमागे उभा आहे, हे तो ससा विसरून गेला आहे.

माणसाने या देह व मनावरील ममता देवाला अर्पण करावी. तेंव्हा या देहरूपी ताडावरील मनरूपी विहिरीच्या कांठी असलेले विषयरूपी गवत वाळून जाते. त्याचक्षणी सशाप्रमाणे असणारा जीव भाव नाहीसा होऊन, देव भाव उत्पन्न होतो. त्या अनुभावी पुरूषाचे जीवन पवित्र, परिशुध्द, आनंदपूर्ण. हे स्वाध्याय प्रवचनाचे अमृत फल होय ! आपल्या श्रध्देचे नेत्र उघडण्यास अशा अनुभावी महापुरूषांचा एक शब्द, एक वचन पुरे !

श्रेष्ठ म्हणजे महान. अमूल्य ! या जगांत सर्वांहून श्रेष्ठ असे काय आहे? असा विचार करीत गेलो तर एकाहून एक मोठा वाटूं लागतो.

शेवटी सर्वांकडून मोठे...श्रेष्ठ असे जे राहते तेच सर्वश्रेष्ठ ! तोच सत्य-देव.

कांही लोक राजवाड्यासारखे भव्य घर बांधतात. लोक त्यांना मोठ्या घरचे असे म्हणतात. त्यांचा मोठेपणा श्रेष्ठत्व अवलंबून असते ते त्यांच्या मोठ्या घरावर ! ते मोठे घर नसेल; तर त्याच क्षणी ते लहान होतात. हा खरा मोठेपणा अथवा श्रेष्ठत्व नव्हे.

कांही जण वय वाढल्याने वडील अथवा श्रेष्ठ वाटतात. तर कांही जण आजानुबाहु बलाढ्य सुंदर शरीर असल्याने मोठे अथवा श्रेष्ठ वाटतात. पण हे शरीर कृश झाले असता त्या बलवानाचा मोठेपणा टिकून राहात नाही. आणखी कांहीजण धन-सोने, नाणे, कपडे-लत्ते, सत्ता, पदवि, प्रशस्ती यांवर अवलंबून समाजांत मोठेपणा मिळवतात. ज्या वस्तूंवर त्यांचा मोठेपणा अवलंबून असतो. त्या वस्तु नाहीशा झाल्या तर त्यांचा मोठेपणा सुध्दा अदृश्य होतो.

एकदां शंभर या संखेने आपणच श्रेष्ठ आहोत ! असा टेंभा मिरवला. त्याच्या जवळ एक-दोन असे लहान अंक आले तरी, त्याने त्यांची दरवल सुध्दा घेतली नाही. त्यांच्या कडे अत्यंत क्षुद्र दृष्टीने पाहिले. 'तुम्ही सगळे क्षुल्लक आहांत' अशी त्यांची अवहेलना केली. त्याचे हे अनुचित वर्तन पाहून त्या शंभर संख्येतील एक या संख्येला फार वाईट वाटले. ''या शंभराला चांगला धडा शिकविला पाहिजे'' असा विचार करून एक हा अंक थोडासा दूर गेला. त्याच क्षणी मी श्रेष्ठ ! असे म्हणणाऱ्या शंभराचा मोठेपणा नाहीसा झाला. बाजूला सरला एक. पडला शंभर !

दुसरा फिलिप्स इंग्लंडचा राजा होता. सारी प्रजा त्याला भूलोकावर अवतरलेला साक्षात देव मानीत होती. एकदां फिलिप्स राजा आपल्या पांच वर्षाच्या नातवा समवेत घोड्यावर स्वार होऊन विहारासाठी जंगलात गेला. एका झाडाला घोड्यांना बांधून उघड्या मैदानात ते फिरत गेले. संध्याकाळची वेळ. एकाएकी आकाश ढगांनी

भरून गेले. व पाऊस पडूं लागला. आपला नातू भिजेल असे वाटून फिलिप राजा म्हणाला, ''चल, आपण झाडाखाली थांबू या''

नातू म्हणाला , ''नको, आपण येथेच थांबू या ''

''आपण पावसांत भिजूं'' राजा म्हणाला

''महाराज आपण पावसाला थांबायची आज्ञा द्या ना''नातू म्हणाला.

''पाऊस माझी आज्ञा पाळीत नाही'' महाराज म्हणाला

''तर मग तुमची प्रजा तुम्हाला सर्वश्रेष्ठ कां बरे म्हणते?'' नातवाने विचारले. नातवाचे बोलणे ऐकून महाजाराचे ज्ञानरूपी डोळे उघडले. श्रध्दा दीप प्रज्वलित झाला. सत्य देवच सर्व श्रेष्ठ याचे ज्ञान त्याला झाले.

अशा प्रकारे श्रेष्ठ कोण? याचे शब्द चिंतन करीत असतां आपणांस सर्वश्रेष्ठ कोण याचे ज्ञान होते. आपण सत्य देवाच्या जवळ येतो. आनंद सदन गांठतो.



# १३ अनंत

धर्मसाधनेने सत्यदर्शन. सत्यदर्शनाने आनंद अनुभव. श्रध्दा, सदाचार, संस्मरण, समरति ही धर्माची अनिवार्य अंगे. श्रध्दा म्हणजे अत्यंत प्रबुध्द प्रज्ञा. सत्याचे ज्ञान करून देणारे बौध्दिक सामर्थ्य ! बुध्दी जागृत होऊन सत्य ग्रहण सामर्थ्य. वाढण्यासाठी साधना आवश्यक ! शब्द चिंतन एक सोपे सुगम साधन !

चिंतन मंथन करीत एक तात्विक शब्दाचा मागोवा घेत घेत आपण सत्याच्या समीप जाऊन पोहोचतो. उदाहरण आम्रवृक्ष या शब्दाचा उच्चार करतांच आंब्यांनी लगडलेल्या सुंदर आम्रवृक्षाचे चित्र आपल्या नजरेसमोर उभे राहते. येथे प्रत्यक्ष आंब्याचे झाड नाही. पण त्याचे चित्र आपणांस नज़रेसमोर स्पष्ट दिसते.

हिमालय या शब्दाचा उच्चार करतांच हजार मैलाहून अधिक विशाल असा हिमालय पर्वत आपल्या नजरे समोर उभा राहतो. कोठे चार अक्षरांचा शब्द हिमालय? आणि कोठे तो विशाल पर्वत राज? पण केवळ चार अक्षरांच्या या हिमालय शब्दाच्या केवळ उच्चाराने त्या भव्य पर्वत राजाचे चित्र आपल्या नजरे समोर उभे राहते.

शब्दाची व्याप्ती त्या शब्दाच्या अर्था येवढीच विशाल ! संपूर्ण जगालाच आपल्या नजरेसमोर उभे करण्याचे त्याचे सामर्थ्य निस्सीम ! त्या अर्थाने शब्दच ब्रह्म होय !असे शब्द चिंतन सत्य दर्शनाला सहकारी! आतां एक चिरपरिचीत शब्द चिंतन ''अनंत''

अंत अथवा शेवट ज्याला नाही, ते अनंत. ज्याला अंत आहे

ते सांत. अनंत वस्तु अपरिमिंत. सांत वस्तु परिमित. येथे एक झाड आहे. त्याचा विस्तार लांबी रूंदी उंची मोजता येते. त्यामुळे ते परिमित. अशा सांत वस्तु या जगांत असंख्य आहेत. त्यांच्यामुळेच हे जग वैविध्यमय ! सुंदर !

फुलामध्ये देठ, पाकळ्या, केसर, पराग, मकरंद या सर्व सांत वस्तूच. त्यांच्या समुचयाने फूल सुंदर बनले आहे. या समुचयांपैकी एखादी वस्तु अनंत असती आणि अन्य वस्तूनां तेथे स्थान नसते; तर ते फूल होऊन राहिले नसते. सौदर्याचा अविर्भाव झाला नसता. या अर्थाने पाहिल्यास घर-दार, शेती-वाडी, सति-सुत, बंधु-बांधव सर्व कांही सांत होत. अशा सांत वस्तूंच्या अथवा शब्दांच्या चिंतनांत आपले मन सुध्दा तितकेच संकुचित, सांत होते. सातं वस्तु चिंतनाने संघर्ष, असमाधान, उद्विग्नता, भयभीती कोलाहल असणे सहज. त्यामुळे अपार दुःख हाच प्रपंच.

माणसाला सांत वस्तूंचा फारच मोह ! वयाच्या २५-३० वर्षी लग्न करून नूतन गृह प्रवेश करतो. मुले-बाळे, नातवंडे, पैसा-अडका, कोट-कचेरी सर्व कांही घडते. ऐंशी वर्षे निघून जातात. तो एक दिवस सुध्दा घरांतून-संसारातून बाहेर येत नाही. अनंत सत्य देवाला जाणून घेण्याचा प्रयत्न करीत नाही. परमानंद प्राप्ती होत नाही. केवळ एका सांत घराच्या चिंतनातच माणूस आपले अमूल्य आयुष्य गमावतो. हेच सांत चिंतन होय. येवढेच नव्हे तर अनंत वस्तूला सुध्दा सांत बनवून संतोष मानण्याचा विचित्र स्वभाव मानवाचा.

गंगा अथवा ब्रह्मपुत्रा नदीचा प्रवाह हजारो किलोमिटर लांब त्या महाप्रवाहातून एक चंबूभर पाणी माणूस आपल्या घरी आणतो. तो चंबू आपल्या देवघरांत ठेवतो. अष्टविधार्चन करून साष्टांग नमस्कार करून गंगास्तोत्र पठण करतो. हिमालयाच्या गंगोत्रीहून निघणारा तो प्रवाह कोठे? आणि आपल्या देवघरातील चंबूभर पाणी कोठे?

इजिप्त देशांत हजारो वर्षापूर्वी सूर्यपूजा करीत असत. तांबे, पितळ अथवा चांदीची सूर्य मूर्ति बनवून ती मूर्ति देवघरांत ठेवून पूजा करीत असत.

हे सूर्य देवा, आम्हाला दर्शन दे'' अशी प्रार्थना अंधाऱ्या खोलीत बसून करीत. बाहेर अनंत आकाशंत तळपणारा सूर्य यांची दिवसभर वाट पाही.

आपल्या भूमीचा व्यास सुमारे तेरा हजार किलोमीटर आहे. असे दहा लाख भू-ग्रह सूर्यांत समावू शकतात तो सूर्यच या जगाचा प्राण ! महाशक्ती मूळ ! समस्त निसर्गाचे चेतन ! आपल्या डोळ्यांतील तेज, बुध्दीची चमक, बाहु बल सर्व कांही त्याच्यामुळेच. त्या सूर्य देवाची भव्यता दिव्यता कोठे? आणि आपल्या देवघरांतील ती इवलीशी मूर्ति कोठे? आपल्या प्रपंचाच्या सर्व सांत वस्तूच्या सीमा गळून पडल्या तरं उरतो अनंत-सत्य-शिव !

वर्तुळात व्यास असतो. त्या व्यासाच्या सुमारे तिप्पट त्याचा परीघ असतो. व्यास जसजसा वाढत जाईल तसतसा परीघ सुध्दा वाढत जातो. या व्यासाच्या बंधनाने वर्तुळ लहान बनते. व्यासाची दोन्ही टोके मुक्त केल्यास वर्तुळ अनंत बनते. अपरिमित बनते. अपरिमित व्यासाच्या संगाने वर्तुळ अनंत बनते. अपरिमित बनते. परिमित व्यासाच्या संगाने वर्तुळ सांत-परिमित ! अपरिमित आत्मा या देहाच्या संगाने परिमित वाटतो. या देहाचा विसर पडला की, मी स्त्री-पुरुष, काळा-गोरा, गरीब-श्रीमंत कांही नव्हे. सहा फूट-तीन फूट नव्हे. शंभर किलो नव्हे. वजनाला अतीत असा अनंत आत्मा म्हणजेच मी. असा सांत पासून प्रारंभ करून अनंत आत्म्यापर्यंत पोहोचणे;हीच साधना.

भिंतीमुळे घर लहान झाले. या चार भिंती नाहीशा झाल्यातर हे लहान घर जगा येवढे ---- आकाश येवढे ---- अनंत ! याचा अर्थ आपण आपल्या घराच्या भिंती पाडून उघड्यावर रहावे; असा न व्हे. या

चार भिंतीत राहूनही आपण अनंताची परिभावना करावी. सांत असे घर-दार क्षणिक ! अशाश्वत ! अनंत अवकाश हे शाश्वत ! क्षणिक आणि अशाश्वत अशा देहाची परिमिति आपण क्षणभर विसरावे. त्याच क्षणीं आपणांस अनंत सत्याचे दर्शन घडते. देहाची परिमिति नाहीशी करतांच या जगांतच सत्य देव दर्शन !

आपली पौराणिक देव-कल्पना खरोखर दिव्य-भव्य. शिव म्हणजे शांति, मंगल. गणपति सुज्ञानाचा संकेत. विष्णु म्हणजे सर्वव्यापि. देवांचे हे तात्त्विक अर्थ आपण विसरलो. त्यांना विभिन्न रूप देऊन, सर्व देवांमध्ये आपण भेद-भाव निर्माण केला. एका पुरुष मूर्तीच्या हाती दंड, कमंडलु, डमरू देऊन त्याला आपण शिव हे नाव दिले. आणखी एका मूर्तीच्या हाती सुदर्शन चक्र देऊन त्याला विष्णु हे नांव दिले. हत्तीचे डोके, मोठे पोट, उंदराचे वाहन करून त्याला गणपति हे नांव दिले. पण या सर्व मूर्तींना आधार अशी जी माती अथवा शिला...अवकाश..अनंत सत्य त्यांला विसरलो.

एक अनुभावि गुरू. अरण्यांत आश्रमवास. त्यांच्यापाशी एक श्रीमंत भक्त आला. गुरूंना वंद करून म्हणाला,

''गुरुदेव या प्रपंचाने मला जखडून ठेवले होते. म्हणून मला आपणांपाशी येतां आले नाही. मला देवदर्शनाची अपार ओढ लागली आहे. कांहीतरी सोपा उपाय सांगा !''

त्या भक्तामध्ये असलेली देवदर्शनाची ओढ पाहून गुरूने त्याला एका मातीची मूर्ति दिली. आश्रमाच्या आवारांत एका झाडाखाली बसवून

''एकाग्र चित्ताने या मूर्तीचे ध्यान कर'' असे सांगितले '' या मूर्तीमध्येच तुला सत्यदर्शन घडेल !''

तो भक्त एकाग्र चित्ताने त्या मूर्तीचे ध्यान करूं लागला. या मूर्तीतच जीवकळा भरून आपणांस दर्शन घडेल. असे त्या भक्ताला

वाटले. दोन चार दिवस ध्यान केल्यानंतर त्या भक्ताला ती देवमूर्ति पापण्यांची उघडझाप करीत असल्याचा भास झाला. पण दुसऱ्याच क्षणीं ती मूर्ति पूर्वी इतकीच निश्चल होती. निराश न होतां; तो ध्यान करीतच राहिला. कित्येक दिवस-महिने लोटले तरी त्याला सत्य देव दर्शन घडले नाही.

एके दिवशी तो भक्त तदेक चित्ताने त्या मूर्तीचे ध्यान करीत बसलेला असतां एकाएकी आकाशांत मेघ जमा झाले. मुसळधार पाऊस कोसळू लागला. ती मातीची मूर्ति पाण्यात विरघळून वाहून गेली. ''देवच वाहून गेला '' असे वाटून तो भक्त घाबरला. तेवढ्यांत गुरू तेथे आले. त्यांनी विचारले, ''तुला देवदर्शन घडले का?''

''नाही गुरूदेव सर्व कांही वाहून गेले.'' भक्त घाबरून म्हणाला.

गुरू म्हणाले, '' जाणारे ते गेले. असणारे ते उरले. त्याचेच ध्यान कर'' तत्क्षणीच भक्ताला अनंत, अविनाशी सत्य उमगले. देवदर्शन घडले.

अनंत शब्द चिंतनाने श्रध्देचे डोळे उघडतात. धर्मसाधना पूर्ण होऊन सत्यदर्शन घडते परमानंद प्राप्ती होते. ''हाच आनंदयोग !''



# १४ व्यक्त-अव्यक्त

श्रध्दा हे धर्माचे प्रथम अंग. श्रध्देने सत्यज्ञान होते. सत्याच्या ज्ञानाने सदा आनंद. सत्यग्राहक सामर्थ्य असलेली श्रध्दा सर्वांच्या अंतरंगात असते. तिचा विकास करणे हीच साधना ! देह, मन, बुध्दि ही सर्व निसर्गाची अपूर्व देणगी. डोळ्यांतील तेज, बुध्दीची चमक, मनाची मधुरता केवढे सुंदर ! वर वर पाहतां या देहांत कांहीही दिसत नाही. जे कांही आहे, ते योग्य रीतीने विकसित केले तर आपले जीवन भव्य-दिव्य !

एक महान गुरू होते. त्यांचे दोघे शिष्य. एकदां गुरू देश संचाराला निघाले. त्यांनी आपल्या दोघांही शिष्यांना जवळ बोलावले. म्हटले, ''मी देश संचार करून परत यायला कित्येक वर्षे लागतील. मी परत येई पर्यंत तुम्ही आश्रमांत साधना करीत रहा.''

शिष्य म्हणाले, ''गुरूदेव, आपण धर्म प्रसारासाठी देशसंचार करीत आहांत. आम्हाला फारच संतोष होतो आहे. पण साधना करण्यासाठी आम्हांला कांहीतरी साधन द्या !''

गुरूने दोघाही शिष्यांना ओंजळभर भाताचे दाणे दिले. सांगितले, ''मी परत येईपर्यंत हे दाणे सुरक्षित ठेवा. तुमचे कल्याण होईल.''

एका शिष्याने ते भाताचे दाणे एका कापडांत व्यवस्थित बांधून देव्हाऱ्यांत ठेवून त्यावर बेलपत्री, फुले वाहून त्यांची षोडशोपचार पूजा केली. गुरु परत येईपर्यंत त्रिकाल पूजा, आरती वगैरे यथासांग सुरू होते.

दुसऱ्या शिष्याने विचार केला की, ''हे दाणे ठेवून दिले तर नासून कुजून जातील. यांना पेरून वाढवावे. गुरू करूणा एकाला शंभर होऊन पवित्र नदी होऊन प्रवाहित व्हावी'' त्याने आश्रमाच्या सभोवतालची जागा स्वच्छ केली. ते भाताचे दाणे त्याने योग्य वेळी पेरले.

''गुरूने दिलेले पवित्र भाताचे दाणे मातीत मिसळून त्यांचा नाश करतो आहे हा!'' अशी त्या शिष्याने टीका केली. याने ती टीका लक्षांत न घेतां खूप अंग मेहनत करून पीक वाढविले. ओंजळभर दाणे ..पिकून त्यांची मोठी रास झाली. आश्रम धान्याने भरून गेला. नित्य अन्न संतर्पण सुरू झाले. कितीतरी भक्त आश्रमांत येऊन पोटभर जेवून तृप्त होऊन जात. आतां आश्रम आनंद धाम झाले. पहिला शिष्य या दुसऱ्या शिष्याच्या भोजनगृहांत जेवून निर्गतिकपणे राहू लागला. गुरूने दिलेले तेच भाताचे दाणे. एका शिष्याच्या हाती ते माती झाले. दुसऱ्या शिष्याच्या हाती मातीचे मोती झाले..सोने झाले.

सत्य-साधने मध्ये दोन प्रकार! एक निराकार साधना; दुसरी साकार साधना. सत्य देवाचे अव्यक्त अदृश्य रूपांत चिंतन करणे ही निराकार साधना होय. तेच सत्य व्यक्त रूपांत चिंतन करणे साकार साधना! आतंपर्यंत जे चालले; ते शब्द रूपाचे अव्यक्त चिंतन. हे थोडेसे कठिण. सत्यदेवाची व्यक्त साधना सुलभ-सुंदर!

संख्या कितीही मोठी असली, तरी ती मोजतां येते. पण असंख्या मोजतां येत नाही. आकाशांतील वातावरणांत पाण्याचा अंश आहे. पण तो डोळ्यांना दिसत नाही. हीच आर्द्रता घनीभूत झाली तर मेघ निर्माण होतात. विविध रूप धारण करून ते आकाशांत तरंगत असतात. डोळ्यांना त्यांचे सुंदर रूप दिसते. हेच मेघ गर्जना करून विजेचा लखलखाट करून विरघळून पावसाच्या रूपाने धरतीवर कोसळतात. नद्या-नाल्यांच्या रूपाने वाहूं लागतात. हे मेघ- हे जल आपण सहज

पाहूं शकतो. पण वातावरणांतील आर्द्रता केवळ डोळ्यांच्या सहाय्याने पाहतां येत नाही. वातावरणांतील आर्द्रते प्रमाणे अव्यक्त असते निराकार महासत्य ! मेघाप्रमाणे असते ते साकार महासत्य ! हे सुलभतेने ग्राह्य. या सांत जगांत महासत्य ओळखणे व्यक्त साधना. आपल्या प्रिती-वात्सल्याला कारण अशा सांत वस्तु शेकडो. त्यांना पाहून आपण तेथे देवाला ओळखावे.

एक मिणमिणता दिवा. थोड्याशा पैशांत तेल विकत आणले तर त्याचे पोट भरते. तो दिवा रात्रभर जळतो. सभोवती आनंदाचा प्रकाश पसरवितो. कोट्यावधि रूपयांचे मूल्य असलेले सोने-नाणे असा प्रकाश देऊं शकत नाही. त्या दिव्याचा प्रकाश आपणांस सुख-शांति देतो. सोने-नाणे यांची रास पाहतां राग-द्वेष ! सर्वांना आनंदाचा प्रकाश देऊन घर उजळणाऱ्या त्या दीपामध्ये देवाला पाहणे ही व्यक्त साधना होय. अव्यक्त सत्यच येथे ज्योत होऊन प्रकाशते. अशा प्रकारे या जगांत जेथे जेथे परिशुध्दता, पावित्र्य, सौंदर्य, सामर्थ्य शांति समाधान वगैरे दैवी गुण आढळतात. तेथे देव अभिव्यक्त होतो. हे ओळखणे हीच व्यक्त साधना होय.

एक रजपूत राजा होता. त्याला दोन कन्या होत्या. त्या दोघीही रूपवती आणि गुणवती होत्या. एकदां थोरली राजकन्या आपल्या सखी समवेत नदी स्नानाला गेली. पहाटेची वेळ. त्याच्या आदल्या दिवशी रात्रीच शत्रुचे सैन्य त्या नदी कांठी विश्रांति घेत होते. अनेक राज्ये धुळीला मिळवून संपत्तीची लूट करून आलेले क्रूर शत्रु सैन्य होते ते. त्या शत्रू सैन्याधिपतीने राजकुमारीचे अद्भूत लावण्य पाहिले. तो वेडा झाला. राजकन्येला परिस्थितीची जाणीव होतांच ती लगबगीने राजवाड्यांत परत आली. तिने वडिलांना सर्व हकीकत सांगितली.

राजा संकटांत सांपडला. अपार शत्रु सैन्यापुढे आपला निभाव लागणार नाही. याची त्याला खात्री होती. त्याच वेळी शत्रूचा संदेश

आला. ''राजकन्येला आपल्या मुक्कामी पाठवून दे. अन्यथा युध्दाला तयार हो!''

एकीकडे आपली लाडकी कन्या अणि कुळाचा गौरव. दुसरीकडे हजारो निरपराध नागरिकांची कत्तल. काय करावे? राजाला समजेना. राजकन्येला परिस्थिती समजली. तिने राजाला विनंति केली. '' मला शत्रूसैन्यात पाठवून द्या''.

राजकन्येचे बोलणे ऐकून राजाला मोठा घोर पडला. ''लांडग्यांच्या कळपांत हरिणीला कसे पाठवायचे?''

''क्षमा असावी महाराज, मी हरिणी नव्हे. सिंहीण. उशीर झाला तर राज्याला अपाय. त्यांना निरोप पाठवून द्या की संध्याकाळी राजकन्या तुमच्या शिबिरांत येईल.''

तिने आपल्या विश्वासू सहकाऱ्यांना आपली योजना सांगितली.संध्याकाळी शत्रूच्या गोटांत प्रवेश करून तिने आपण शरण आल्याचे भासविले. त्याने एका विशेष तंबूमध्ये तिची राहण्याची व्यवस्था केली.

रात्र पडतांच सगळे दिवे विझवून अंधार करण्याची राजाज्ञा झाली. राजकुमारी आपल्या महाराजांच्या सेवेत आली; हे ऐकून शत्रु सैन्य गाफील राहिले.

राजकुमारीने मध्यरात्री उठून शत्रूचे सर्व तंबू पेटवून दिले. निवडक राजपुतांनी रात्रीच्या वेळी शत्रू सैन्य कापून काढले. राजकन्येने हंसत हंसत स्वत:ला त्या अग्निकांडात झोकून दिले. आपले प्राण देऊन तिने हजारो निरपराध नागरिकांचे प्राण वांचविले. अशा त्यागजीवी जनांत...सांत साकार, सुंदर जगांत सत्य देवाला पाहणे, ही व्यक्त साधना!



# १५ साकार-निराकार

सामान्यपणे वस्तूला दोन रूपे. १) डोळ्यांना दिसणारे स्थूल साकार रूप. २) डोळ्यांना न दिसणारे सूक्ष्म असे निराकार रूप. जी वस्तु मुळांत डोळ्यांना न दिसण्यासारखी सूक्ष्म असते, ती निराकार. तीच वस्तु स्थूल झाली असतां डोळ्यांना दिसू लागते. ती साकार.

ही एक फुलवेल. यांत पाने, देठ, फूल, पाकळ्या सर्व कांही स्पष्ट दिसते. हे वेलीचे साकार रूप. ही वेल वाढण्यापूर्वीच बीजामध्ये देठ, पाने, फुले सर्व कांही डोळ्यांना न दिसण्यासारखे सूक्ष्म रूपाने होते. ते वेलीचे निराकार रूप.

येथे एक सुंदर देवमूर्ति आहे. डोळ्यांना दिसते. मन आकर्षून घेते. ही साकार. या मूर्तीचे चित्र शिल्पकाराच्या मनांत प्रथम उमटले. कोणालाही न दिसणारे सूक्ष्म रूप. ही मूर्तीची निराकार अवस्था. एके दिवशी शिल्पकाराने छन्नी आणि हातोडा हाती घेऊन आपल्या मनांतील सूक्ष्म मूर्तीला स्थूल रूप दिले. दगडांत ते रूप व्यक्त झाले. साकार रूप धारण केले.

मनुष्य जन्माला येण्यापूर्वी या जगांत होता. सूक्ष्म रूपाने ! किती सूक्ष्म? तो नाहीच असे वाटण्या इतपत. तो फळांमध्ये गोड रसाच्या रूपाने होता. मातीत उगवणाऱ्या धान्याच्या रूपांत होता. पाण्यांत थंड रूपाने होता. फुलांत सुगंधाच्या रूपाने होता. हवेंत प्राणचेतन होऊन अदृश्य रूपांत होता. ते अन्न-पाणी-हवा सेवन करणाऱ्या माणसांत तोच रूप धारण करून बाळाच्या रूपाने पाळण्यांत उतरला. मोठा झाला.

शेतकरी, व्यापारी, वैद्य, वकील...नाना रूपे त्याने धारण केली. जगाच्या कणाकणांत तो सूक्ष्म अणु रूपाने होता. तो निराकार माणूस, आतां स्थूलरूप धारण करणारा माणूस साकार !

बीज अंकुरले अणि वेल बनले. शिल्पकाराच्या मनांतील सूक्ष्म चित्रच शिळेमध्ये फुलले. अणुंमध्ये अदृश्य रूपाने असणारा माणूसच देह धारण करतो. तसेंच निराकार सूक्ष्म सत्यच साकार रूप धारण करून स्थूल जग बनले. जे आहे, तेच दिसू शकते. नसलेले कधींच दिसणार नाही. आधी असलेले मूळ सत्यच जग होऊन दिसले. हे जग अणि सत्य वेगवेगळे नव्हेत. त्यामुळे साकार जगत पाहतांना निराकार सत्याची परिभावना करणे,हीच धर्म श्रध्दा !

जपान देशांत एक ज्येष्ठ गुरू होता. तो दार्शनिक, सत्यद्रष्टा असा त्याचा लौकिक सर्वत्र पसरला होता. एकदां एका शिष्याने त्याला विचारले, ''आपण दार्शनिक ! परम सत्याचे दर्शन घेतलेले. असे लोक म्हणातात. तुम्ही काय पाहिले? गुरू होण्यापूर्वी आपण जसे होता तसेच आतांही आहांत. तसाच देह, चालणे-बोलणे तसेच आहे नां?'' गुरू म्हणाले, ''शिष्या तूं म्हणतोस ते खरे आहे. मी पूर्वी प्रमाणेच चालतो, बोलतो, पाहतो''

शिष्याने पुन: विचारले, ''तर मग लोक तुम्हांला दार्शनिक म्हणतात ना? कां बरे?''

गुरू म्हणाले, ''तेव्हा मी फक्त रूप तेवढे पाहात होतो. शब्द तेवढाच ऐकत होतो. आता रूपाबरोबरच थोडेसे निरूप पाहतो. शब्दाबरोबरच नि:शब्द ही थोडेसे ऐकतो.''

या साकार जगांत निराकार सत्य पाहणारेच दार्शनिक, हे सत्य त्या शिष्याला उमगले.

साधु-संत, शरण हे या जगांत तुम्हा-आम्हांप्रमाणेच असतात. पण या दृश्य जगाच्या मागे असलेले परम सत्य आपल्या अंतरंगी

अनुभवितात. संख्या मोजतांना असंख्याची परि कल्पना गणितज्ञाला असते. तसेंच थोर महात्मे शब्दादि विषयांमध्ये असलेले निःशब्द निराकार ब्रह्म जाणतात. म्हणूनच ते या प्रपंचात असून नसल्याप्रमाणे निर्लिप्त होऊन असतात. तेच दार्शनिक, मुक्त !

एक होता तरूण. सुंदर...सशक्त ! त्याचे आई-वडील अकस्मात निवर्तले. घरांत अपार संपत्ति. त्याला बरे-वाईट सांगणारे वडीलधारे माणूस घरांत कोणी उरले नव्हते. या संधीचा लाभ एका गणिकेने घेतला. त्या तरूणाला संगीत, नृत्य, विलासांत रमवून त्याचे मन जिंकले. पाहतां पाहतां तरूणाची सर्व संपत्ति गणिकेने बळकावली. तो तरूण निर्गतिक झाला. कफल्लक झाला.

त्याला अकस्मात एका थोर महात्म्याचे दर्शन घडले. त्या तरूणाने आपली व्यथा त्या महात्म्यांना सांगून खूप आंसू ढाळले. त्या महात्म्यांनी त्याला, ''ॐ सर्वं क्षणिकं !'' असे सांगून त्याचे सांत्वन केले. त्या तरूणाला ''ॐ सर्वं क्षणिकं '' हाच मंत्र ठरला. पाहिलेले, ऐकलेले सर्व क्षणिक ! तो त्या मंत्र साधनेंत निमग्न झाला. आतां त्याच्या डोळ्यांत काम-विकार नव्हता. क्रोध नव्हता. जीवनांत अगाध परिवर्तन घडले होते. गुरूच्या आज्ञेप्रमाणे परिव्राजक होऊन तो धर्मप्रचाराला निघाला.

हाती भिक्षापात्र, डोळ्यांत दैवी तेज, भिक्षा मागत, ज्ञान बोध करीत देशसंचार करूं लागला. एके दिवशी तो एका मोठ्या घरासमोर भिक्षा मागण्यासाठी गेला. ते घर होते त्या गणिकेचे. सदा सत्यान्वेषणांत गुंतलेल्या त्या तरूण परिव्राजकाचार्याला त्या गणिकेची ओळख लागली नाही. तिने त्याला ओळखले. घरांत बोलाविले. सुखासनावर बसवून त्याचा यथोचित आदर-सत्कर केला. तो तरूण सन्यासी पुनः आपल्या जाळ्यांत सांपडेल असे तिला वाटले. तिने लाडालाडाने विचारले, ''मला ओळखले का? मी कोण आहे?''

"मी तुला ओळखले पण तूं विचारतेस त्या रीतीने मी तुला ओळखले नाही"

पूर्वी त्या तरूणाच्या डोळ्यांत काम होता. आज त्याच डोळ्यांत कारूण्य भरलेले होते ! मनांत सत्य भरले होते !

साकार जगाकडे पाहतांना निराकार सत्य ज्ञान ज्यांना होते, तेच अनुभावी. ही निराकार साधना. साकार जगाचे आकर्षण उल्लंघून निराकार सत्याप्रत पोहोचणे सर्वांना शक्य होत नाही. त्यामुळे या साकार जगांत जेथे जेथे पावित्र्य, परिशुध्दता, शांति समाधान आहे, त्यालाच देव मानावे. ही साकार साधना. ही साकार साधना सरळ, सुंदर सर्वांनाच करतां येण्याजोगी.

पहाटे अरूणोदय होतो. अंधाराचे साम्राज्य विरून हळु हळु प्रकाश पसरूं लागतो. पूर्व दिशा लाल रंगाने न्हाऊन जाते. सूर्याचा लालभडक गोळा क्षितीजावरून डोकावू लागतो. कांही वेळाने सुवर्ण वर्णाचा होतो. सारी सृष्टि सोनेरी रंगात उजळू लागते. थोड्याच वेळांत सुवर्ण किणांचे रौप्य किरणांत रूपांतर होते. बाल रवीची ही बदलती रूपे किती मनमोहक असतात !

रात्रीच्या वेळी दुग्ध-धवल-शीतल चंद्राचे चांदणे सारी सृष्टि रहस्यमय...रम्य भासते. कोणालाही मंत्रमुग्ध करणारी ही दृश्ये. पाहणाऱ्याच्या हृदयात शांतिचा मधुर रस उत्पन्न होतो. अशा या पवित्र दृश्यामध्येच देवाची परिभावना करणे हीच साकार संत्य देवोपासना होय !

हे एक सुंदर पुष्प. मकरंदाने भरलेले. कोमल. परिमळयुक्त असे पुष्प पाहिल्यानंतर कोणाचेही हृदय फुलाप्रमाणे उमलते. शंति-सौख्याचा सुगंध मनांत भरून वाहू लागतो. अशा त्या पवित्र पुष्पाला पाहून त्यालाच देव मानणे हीच साकार साधना होय !

देवाचे दर्शन घडल्यावर त्या देवाकडे कितीतरी मागावेसे

कदाचित भक्ताला वाटण्याचा संभव आहे. पण या फुलाकडे पाहिल्यानंतर अशी आशा होत नाही. त्यामुळे फूल हे देवासमान..कांकणभर सरसच ! साकार सत्यदेवोपासनेचे हे सुवर्ण साधन होय !



# १६ प्रपंच-परमात्मा

आपली क्रिया, भाव, बुध्दि यांमध्ये धर्म असावा. तेंव्हा आपणांस सत्यदर्शन होते. त्याने आनंदानुभव होतो. धर्माचा प्रमुख घटक श्रध्दा. श्रध्देमध्ये अनेक अंश. सत्यग्रहण सामर्थ्य हे श्रध्देचे प्रधान अंश. ती विकसित प्रज्ञा. प्रकाशमान मति. या जगामध्ये सन्निहित निराकार सत्य, परमात्म्याचे दर्शन ही श्रध्दा आपणांस अत्यंत सहजपणे घडविते. निराकार सत्य जाणण्याचे सामर्थ्य कांही सर्वांना नसते. फारच थोड्या लोकांना ते सामर्थ्य असते.

गणितांत रेखा सिध्दांत फारच सुंदर. 'ज्याला लांबी असते पण रूंदी नसते त्याला रेखा म्हणतात.' रूंदी नसलेली रेखा लिहितां येत नाही. पाहतां येत नाही. पण रेखा गणिताचा अभ्यास करतांना आपण ती लिहून दाखवितो. ते रेखेचे साकार रूप होय. पण खऱ्या रेखे ची छाया मात्र ! अशी छाया रूप रेखा आपण अनेक वेळां लिहावी, चिंतन करावे. त्यानंतर आपणांस खऱ्या रेखेचे ज्ञान होते.

त्याचप्रमाणे परम-सत्याला, परमात्म्याला दोन रूपे. एक दिसणारे रूप. साकार रूप. दुसरे न दिसणारे रूप. निराकार रूप. मनुष्याच्या देहाला निर्दिष्ट आकार आहे. वर्ण आहे. कलाकार कुंचल्याने मनुष्याचे चित्र रंगवू शकतो. पण आत्म्याला अथवा प्राणाला आकार नाही. वर्ण नाही. द्रव्यराशी नाही. प्राण काळा ही नव्हे अन् गोरा ही नव्हे. तो गोलाकार नव्हे...चौकोनी नव्हे. अशा प्राणाचे चित्रण कसे करतां येईल? कलाकाराच्या कुंचल्याला तो गवसत नाही.

इटली देशांत एक जगप्रसिध्द कलाकार होता. त्याचे नांव मायकेल एंजेलो. एकदां एक माणूस मायकेलपाशी आला.

''तुम्ही माझे सुंदर चित्र काढून द्यावे !'' तो म्हणाला. मायकेलने विचारले, ''तुझेच चित्र काढायचे ना?''

''होय माझेच चिंत्र काढायचे ''तो माणूस म्हणाला.

आंत जाऊन मायकेलने एक पांढरा कोरा कागद सुरळी करून त्याच्या हाती दिला. म्हटले, ''यांत तुझेच चि त्र आहे. पहायची कला तुला माहित असेल तर तुला ते दिसेल. पाहायचे सामर्थ्य असेल तर घरी जाऊन पहा''

तो माणूस घरी गेला. या कागदावर आपले अप्रतिम चित्र असेल या कुतुहलाने त्याने ती सुरळी उलगडून पाहिले. तो कोरा कागद होता. त्याची घोर निराशा झाली. तो मायकेलपाशी धांवत आला.

''महाशय तुम्ही माझ्या चित्राऐवजी कोणता तरी कोरा कागद दिला आहे !'' तो माणूस म्हणाला.

मायकेल म्हणाला, ''हेच तुझे खरे चित्र. याजगांत कोणीही तुझे खरे चित्र रेखाटूं शकणार नाही. पण तुझे खोटे चित्र म्हणजे तुझ्या देहाचे चित्र कोणीही रेखाटूं शकेल''

मायकेलचे हे बोलणे ऐकून त्या व्यक्तीला निराकार सत्य, परमात्म दर्शन घडले. आपला अल्बम मात्र खोट्या चित्रांनी भरून गेला आहे. श्रध्देच्या कॅमेऱ्यानेच आपल्या आत्म्याचे परम सत्याचे चित्र काढतां येईल.

निराकार सत्य पाहण्याचे सामर्थ्य फारच थोड्या लोकांना असते. साकार सत्य पाहणे सोपे. साकार अणि निराकार यांत फार मोठा फरक नसतो. खोट्या रेखेची जाडी वजा केली तर तीच खरी रेखा. पण ती डोळ्यांना दिसत नाही. या देहांतच प्राण आहे. त्यामुळेच आपल्या डोळ्यांत तेज, बुध्दीमध्ये चमक. बाहूमध्ये बळ. मनांत

आनंद. तो प्राणच आपण आणि आपण म्हणजेच प्राण ! पण श्रध्देचे डोळे नसल्याने आपणांस प्राणांचे दर्शन होत नाही. या प्रपंचाच्या कणांकणांत परमात्मा भरून राहिला आहे. हे समस्त जग आणि सकल जीवराशी त्या परम सत्याची छाया होय ! म्हणूनच साधू-संतांनी या जगांत सर्वत्र परमात्म्याला पाहिले. त्याच्या दृष्टीने परमात्म्याहून भिन्न असे या जगांत कांहीच उरले नाही.

अक्कमहादेवी परम विरागिणी. तिच्या नेत्रांमध्ये, मनामध्यें, बुध्दीमध्ये सत्याचे रूप, स्मरण, चिंतन. तिला हे सर्व जग चेन्नमल्लिकार्जुनाने व्यापलेले दिसले. देवालय वाटले.

वनवेल्ला नीने. वनदोळगण देव तरूवेल्ल नीने
तरूविनोळ गाडुव खगमृगवेल्ल नीने
चेन्नमल्लिकार्जुना, सर्व भरितनागि एनगे मुखदोरा !

(हे सर्व वन तूंच. वनांतील सर्व वृक्ष तूंच. वृक्षामध्ये खेळणारे पशु-पक्षी सर्व तूंच. चेन्नमल्लिकार्जुना, सर्वभरित होऊन तूं मला दर्शन दे )

अक्कमहादेवीला सगळे वन म्हणजे देवच आहे असे वाटले. वनांतील वृक्ष-वेली, पशु-पक्षी, कृमी-कीटक सर्व कांही देवच ! ही सर्वात्मक दृष्टि ! या जगामध्ये सर्वत्र परमात्माच भरून राहिला आहे, हाच भाव !

हजारो वर्षापूर्वी उपनिषदकाळी ऋषींनीसुध्दा या जगांतच सत्य पाहिले. रात्रीची वेळ, निरभ्र आकाश, चंद्राचे रूपेरी बिंब आकाशांत शांतपणे प्रकाशत आहे, दुधाप्रमाणे चांदणे पसरले आहे. अंधाराचे वैभव नष्ट न करतांच प्रकाशणारे चंद्राचे शीतल किरण, मंद वाहणारा सुखदायक शीतल सुगंधित वारा. हे सर्व पाहिल्याने ऋषीला सत्यदर्शन झाले होते. देहभान विसरून आनंदाने गातांना त्याच्या मुखातून बाहेर पडलेले शब्दच संहिता झाली. अतंरंगाची परिमिति नाहीशी केलेले महर्षिच ते !

अशा रीतीने या जगांत जेथे जेथे पावित्र्य, परिशुध्दि आहे,

तेथे भगवद्दर्शन. अहंकार-ममकार यांना अतीत अशा मुग्ध बालकाच्या निर्मल हास्यामध्ये ममतामयी मातेच्या परिशुध्द हृदयामध्ये देव आहे. म्हणूनच ऋषींनी ''मातृदेवोभव !'' म्हटले. मातेचे हृदय म्हणजे प्रेमसागर ! देव निलय !!

एक माता होती. तिला ,एक मुलगा हाता. पति निवर्तला होता. माता मध्यम वयाची. मुलाचे लग्न झाले होते. नवपिरिणीता वधु नांदायला सासरी आली होती. सुनेला स्वातंत्र्य हवे होते. सासूच्या अधीन होऊन राहणें तिला नको होते. आपणच घरची मालकीण व्हावे ही सुनेची इच्छा. सासू घरांत असेपर्यंत ते शक्य नव्हते.

एके दिवशी सुनेने आपल्या नवऱ्याला सांगितले, ''आपण तरूण आहोंत आपण या घरांत आनंदाने रहायचे असेल तर आपणांस स्वातंत्र्य हवे. तुमची आई या घरांत असेपर्यंत ते शक्य नाही. कोठेतरी दूर नेऊन ती परत घरी येऊ नये अशा रीतीने तिला सोडून या !''

पतीलासुध्दा स्वातंत्र्य नसेल, तर संतोष नाही. हे पत्नीचे सांगणे पटले. दुसऱ्या दिवशी त्याने गांवापलिकडे अरण्यांत नेऊन तिच्यासाठी आधीच बांधून ठेवलेल्या झोपडीत सोडून आईला म्हणाला, ''आई, माझ्या बायकोचे आणि तुझे पटत नाही. तूं येथेच या झोपडीत सुखाने रहा. तुला काय हवे ते मी येथेच आणून देईन''

क्रूर श्वापदांनी भरलेले घोर अरण्य ते. कितीही साहसी माणूस असला तरी त्याला तेथे राहणे अशक्यच होते. तरीपण मुलाच्या सुखासाठी माता तेथे रहायला तयार झाली. मुलगा घरी परत जायला निघाला. मातेने आपल्या गळ्यांत असलेला दागिना मुलाच्या हाती देऊन म्हटले, ''तुझ्या वडिलांनी मला प्रेमाने दिलेली ही भेट. मी आतांपर्यंत आपल्या प्राणांहून पलिकडे जतन केले. माझ्या सुनेला ही शेवटची भेट. तुम्ही दोघे सुखी रहा !''

मुलगा घरी आला. त्याच्या पत्नीला अपार संतोष झाला.

आतां आपण या घरांत स्वच्छंदपणे राहूं असे तिला वाटले. आईने दिलेला दागिना आपल्या पत्नीला देत तो मुलगा म्हणाला, ''माझ्या आईची ही तुला शेवटची भेट!'' हे ऐकतांच सुनेचे हृदयपरिवर्तन झाले.

''मी किती निष्ठूर...ती किती दयामयी !'' अशा सासूला घरांतून बाहेर घालविल्याबद्दल तिला पश्चाताप झाला. रातोरात्रीच आपल्या सासूला परत घरी आणायला ती आपल्या पतीसमवेत अरण्याला गेली. तेवढ्यात सर्पदंशाने सासू मरण पावली होती. त्या मातेच्या मुखावर दिव्य प्रसन्नता होती !

अशा प्रेमळ हृदयाची माता देवच नव्हे काय? आपल्या मुला-बाळांवर प्रेमामृताचा वर्षाव करणारा पिता सुध्दां देवच ! या जगांत पवित्र ज्ञानामृत पाजणारा गुरूसुध्दां देवच ! कधीतरी आपल्या घरी येऊन आपल्या सुख-दु:खात सहभागी होणारा अतिथि देवच होय. म्हणूनच ''मातृ देवोभव...पितृ देवोभव...आचार्य देवोभव...अतिथि देवोभव !'' आमच्या प्राचीन ऋषीनी ही घोषणा केली. भारत देशाला हा अमर संदेश होय ! साकार देवोपासनेची सुगम साधने !

पृथ्वियनतिगळेदु अप्पुविल्ल,
अप्पुविनतिगळेदु अग्नियिल्ल
अग्निनतिगळेदु वायुविल्ल
वायुनतिगळेदु आकाशविल्ल
आकाशवनतिगळेदु नादविल्ल
नादवनतिगळेदु बिंदुविल्ल
बिंदुवनतिगळेदु कळेयिल्ल
कळेयनतिगळेदु आत्मविल्ल
आत्मवनतिगळेदु गुहेश्वरनेंब लिंगविल्ल !

महानुभावि अल्लमप्रभुदेवांनी या वचनांत या जगांत परमात्म्याचे अस्तित्व सुंदर रीतीने वर्णिले आहे. जमीनीत पाणी

आहे.पाण्यात अग्नि आहे. अग्नीमध्ये वायु आहे. वायुमध्ये आकाश आहे. आकाशांत नाद आहे. नादामध्ये बिंदु आहे. बिंदूमध्ये कला आहे. कलेमध्ये आत्मा आहे. आत्म्यामध्ये परमात्मा आहे. अशा रीतीने पंचमहाभूतांपासून बनलेल्या या जगामध्ये परमात्मा ओतप्रोत भरून राहिला आहे. त्यामुळे हा प्रपंच (जगत) म्हणजेच परमात्मा. परमात्मा म्हणजेच हा प्रपंच !



# १७ सदाचार

धर्म मार्गात चालले तर सत्यदर्शन होते. संतोष होतो. हेच आनंदाचे सूत्र ! हीच जीवन्मुक्ति. धर्मामध्ये मुख्य घटक तीन १) श्रध्दा २) सदाचार ३) समरस. आतां पर्यंत श्रध्देविषयी सविस्तर चिंतन झाले. आतां सदाचार

सदाचार तीन प्रकारचा. १) संत पाळतात तो सदाचार २) संतांना संमत असा आचार ३) सत्यदर्शनाला सहकारी असा आचार. सत्+आचार:=सदाचार

सत्य ज्यात आहे असा आचार हाच सदाचार होय! सत्य ज्यांत आहे तो भाव, बुध्दि, क्रिया..सद्भाव, सद्बुध्दि सत्क्रिया होय.

'सत्' म्हणजे असणारे. सदा एकाच रीतीने असणारे. सर्व देश काल जनांग(समाज) यांमध्ये एकाच प्रकारे असणारे. उदा. त्रिकोणाच्या सर्व कोनांची बेरीज दोन काटकोन असते.

हैड्रोजनचे दोन अणु व ऑक्सीजनचा एक अणु मिळाल्यास ($H_2O$) पाणी तयार होते.

हे सिध्दान्त सर्व देश, काल, समाज यामध्ये एकच होत. त्यामुळे ही वैज्ञानिक सत्ये ! त्याचप्रमाणे आध्यात्मिक सत्य सुंध्दा सदा एकच असते. बुध्द, बसव, शंकर, महावीर या सर्व महात्म्यांना हे सत्य एकाच रीतीचे. सर्वांना वेगवेगळे होऊन दिसले असते तर ते सत्यच नव्हे !

वृक्ष एकाच ठिकाणी नेहमी स्थिर असतो. पण त्याची सावली

मात्र बदलत असते. सकाळी ती मोठी असते. दुपारी ती लहान होते. सायंकाळी पुन: मोठी होते. सकाळी सावली वृक्षाच्या पश्चिमेला असते. संध्याकाळी पूर्वेकडे असते. वृक्षाप्रमाणे स्थिर असतो तो सत्यदेव. सावलीप्रमाणे इकडे तिकडे जातो तो खोटा देव. हे देव फूल-फळ अर्पण केले तर मात्र प्रसन्न होतात नाहीतर प्रसन्न होत नाहीत. कधी कधी हे देव रागावतात. हे खरे देव नव्हेत.

परम सत्याचे ज्ञान हीच श्रध्दा ! त्याचे आचरणच सदाचार. श्रध्देने हृदयशुध्दि. सदाचाराने बहिरंग जीवन परिशुध्द. धर्म केवळ बौध्दिक क्षेत्रांत एक विचार होऊन राहू नये. तो आपल्या बहिरंग व्यवहारांत आला पाहिजे. हाच सदाचार. विचार आणि आचार परस्पर पूरक, पोषक. एकाची सावली म्हणजे दुसरा. इतके ते अन्योन्य !

आध्यात्मिक जीवनांत आचार-विचारांना कधीच वेगळे करतां येत नाही. लौकिक जीवनांत कधी कधी त्यांना वेगळे करतां येईल. हृदयांत हर्ष नसतांना सुध्दा उघडपणे खोट खोटे हंसतां येईल. आध्यात्मामध्ये तसे नाही. मन मलिन झाले तर तनु सुध्दा मलिन . मन आनंदात असेल तर कृती अणि वाचेमध्ये तो निर्मळ आनंद व्यक्त होतो. ही रुजुता. अंतरंग -बहिरंग शुध्दि ! आंत एक-बाहेर एक असा भाव असेल तर ते धार्मिक जीवन नव्हे. दांभिक जीवन. याविषयी महात्मा बसवेश्वर म्हणतात,

नूरनोदि नूर केळिदरेनु
आसे हरियदु रोष बिडदु
मज्जन क्केरेदु फलवेनु?
मातिनंते मन विल्लद जाति डोंबर नोडि
नगुव नम्म कूडल संगम देव.

आपण किती ग्रंथ वाचले ! किती महात्म्यांची प्रवचने ऐकली? पण त्याचा काय उपयोग? आपल्या मनांतील आशा तुटली नाही. रोष

सुटला नाही. त्यामुळे आमची भक्ति निष्फळ. बोलल्याप्रमाणे मन नसेल, विचाराप्रमाणे आचार नसेल तर आमचे जीवन म्हणजे डोंबाऱ्याचा खेळ. असले हे नाटकीय जीवन देवाला मुळीच आवडत नाही. तो आम्हांला पाहून हंसतो.

समूहगान-सुमधुर संगीत ऐकून आपण मान डोलावतो. या वाद्यवृदांत मृदंग वाजविणारे, हार्मोनियम वाजणिवारे, वायोलिन -वीणा वाजविणारे एकच राग-ताल धरून वाद्ये वाजवीत असतात. गाणारा त्याच तालासुरावर गात असतो. त्या सर्वांमध्ये एक मेळ असतो. म्हणूनच त्यांचे संगीत ऐकून आपण देहभान विसरतो. तन्मय होतो.

आपले जीवनसुध्दा या वाद्यवृंदाप्रमाणेच व्हायचे असेल तर अंतरंगाच्या विचारांचा व बहिरंगाच्या आचाराचा ताळ-मेळ असावा. तसेच पिता-पुत्र, सति-पति, बंधु-बांधव यांच्या आचार विचारामध्ये ताळमेळ असावा. त्यामुळे कुटुंब, समाज, देश यांमध्ये सुख, शांति, समाधान असते. तोच आनंद योग !

परम सत्य जाणून घेऊन संत-शरण देवाला पूर्णपणे शरण जातात. समर्पित होतात. अंतरंग बहिरंग शुध्द असतात. आचार-विचार समन्वित असतात. त्यांचे जीवन हे देवाच्या गाभाऱ्यांत तेवणाऱ्या नंदादीपाप्रमाणे प्रशांत. आशा-आमिष, आवेग-उद्वेग यांचा वारा तेथे वाहात नाही. त्यामुळे त्यांची जीवनज्योत स्थिर निश्चल ! निर्मल !! त्यांच्या जीवनांत आंत-बाहेर परमानंदाचा दिव्य प्रकाश पसरलेला असतो.

दोघे तपस्वी. एक उतार वयाचा व दुसरा तरूण वयाचा. थोरला तपस्वी संसार अर्ध्यावर टाकून आला होता. धाकटा तपस्वी बालपणींच सकल संपत्तीचा त्याग करून सत्यार्थि होऊन आला होता. दोघांनीही अरण्यांत एकत्र राहून अनेक वर्षे तपश्चर्या केली. धाकटा आपल्या सर्व आशा-आमिषांचा त्याग करून सत्याचा मागोवा घेत होता.

थोरला मात्र घरांत असल्या प्रमाणेच वनांत ही होता.

थोरला अरण्यात येताना एक मातीचे मडके घेऊन आला होता. दोघेही अन्न-पाण्यासाठी पाळी पाळीने त्या मडक्याचा उपयोग करीत असत. धाकट्या तपस्व्याने अरण्यात आल्यानंतर गवताची एक सुंदर चटई विणली होती. दोघेही पाळीपाळीने त्या चटईवर विश्रांति घेत असत. थोरला नेहमीच भांडखोर. आतां कसले तरी निमित्त पाहून धाकट्याशी वाद-विवाद करावा असे त्याला वाटले.

एके दिवशी त्याने धाकट्या तपस्व्याला सांगितले, ''यापुढे तुझे-माझे पटायचे नाही. आपण आतां वेगळे होऊं या ! माझे मडके आणि तुझी चटई यांचे दोन समान तुकडे करून आपण वांटून घेऊं या. धाकटा म्हणाला, ''दोन्ही तुकडे करून काय उपयोग? दोन्ही तूंच ठेवून घे. आपण दोघेही पूर्वीप्रमाणेच अन्योन्य होऊन राहूं या '' थोरला म्हणाला, ''आतां तुझे माझे पटणे सर्वथा अशक्य. तूं चटई बनवीत असताना मी सुध्दा सहाय केले आहे. त्यामुळे चटईत माझा सुध्दा वांटा आहे. माझे मडके तूं रोज धूत होतास; त्यामुळे त्या मडक्यात तुझाही वाटा आहे. दोन्ही मध्ये तुझा वाटा असल्याने तूं तुझा वांटा कां मागून घेत नाहीस?''

''ठीक आहे. माझा वांटा मला दे!'' धाकटा तपस्वी म्हणाला. ''ते शक्य नाही तुला कशांतच वांटा मिळणार नाही'', असे म्हणत थोरला भांडण करायला निमित्त शोधत होता.

धाकटा म्हणाला, '' तर मग दोन्ही तूंच ठेवून घे'' आशा रोष यांचा त्याग केल्याने धाकट्याला सत्यदर्शन घडले होते. थोरला अजून मडके-चटई यांतच गुंतलेला होता.

दोघे भाऊ वेगळे झाले होते. शेती वाडी, घरदार यांत वाटण्या झाल्या होत्या. त्या दोघांच्या शेताच्या मधल्या बांधावर एक झाड होते. ते माझे-तुझे म्हणून दोघेही भांडू लागले. कोर्ट कचेरी झाली. अनेक वर्षे

कोर्टात केस चालली. शेवटी ते झाड तोडून दोघांनीही वाटून घ्यावे असा कोर्टाचा निर्णय झाला. पण तोपर्यंत खटल्याच्या खर्चापायी दोघांना आपली जमीन विकावी लागली.

सत्य न जाणणारा माणूस संसारच्या क्षुद्र विषयासाठी भांडतो. अमूल्य जीवनाचे शेतच गमावून बसतो. सत्य जाणणारे सदाचारी संत-महंत सदा संतृप्त असतात. प्रापंचिक क्षुद्र आशेपासून दूर असतात. हेच आनंद सूत्र होय !!



# १८ सत्य

आध्यात्मिक क्षेत्रांत सत्य अत्यंत व्यापक आणि अर्थपूर्ण शब्द. सर्व धर्म-मत-पंथ सर्वांना सारखाच प्रिय. बुध्द-बसव, महावीर, शंकर वगैरे सतांनी शरणांनी सत्याविषयी चिंतन केले आहे. आपल्या प्राचीन ऋषी मुनीनी 'सत्यं ज्ञानं अनंतं ब्रह्म !'' म्हटले. त्यानी सत्य हा शब्द ब्रह्म या शब्दाला पर्याय म्हणून वापरला.

या जगाला, जीवनाला सत्यच आश्रय. सत्य क्षेत्रांत आपल्या जीवनाचे पीक वाढते. सत्य सागरांत आपल्या अनुभवाचे तरंग उत्पन्न होतात. हे अनंत आकाश पसरले आहे. सूर्य प्रकाशतो, भूमि फिरते, वारा वाहतो, असंख्य नक्षत्रे चमकतात. हे सर्व महासत्याच्या आधारावर चालते.

अशा या सत्याला न मानणारा, त्याला विरोध करणारा एकही मनुष्य या जगांत नाही. सत्य नाकारणे म्हणजे स्वत:ला नाकारणे 'मी नाही'' असे सांगण्याला सुध्दा सांगणारा प्रत्यक्ष असावा लागतो. ''सत्य आहे'' अथवा ''सत्य नाही'' असे सांगण्यासाठी तसे सांगणारा 'मी' असावा लागतो. हे माझे अस्तित्वच सत्य नव्हे काय?

सत्य असल्यानेच पंच महाभूते आहेत. देह आहे. सुंदर भावना आहेत विचार आहेत. सत्यामुळेच या जीवनाला जगाला स्थान आहे. अस्तित्व आहे. मूल्य आहे. हे महासत्य स्वयंपोषित ! त्याच्या अस्तित्वासाठी दुसऱ्याची आवश्यकता नाही. हे ''स्वयंसिध्द स्वयं-रक्षित. स्वयं-भवति अस्ति इति स्वयंभू'' आपल्या आपण

दिसते असते, त्यामुळे ते स्वयंभू! ऋषीनी त्यालाच ब्रह्म असे म्हटले.ब्रह्म याचा अर्थ मोठा ! या विश्वांत सर्वाहून अत्यंत मोठा असा जो आहे; तोच ब्रह्म. तेच सत्य. हे पंचमहाभूत एकदां उत्पन्न होतात...नंतर नाहीसे होतात. पण सत्य मात्र सदा असते. त्याला आदि नाही अंत्य नाही ते अनादि अनंत !

ते महासत्य नसलेला देश नाही. काल नाही. ते सर्वव्यापि त्या महासत्याहून अधिक शक्ति या विश्वांत अन्य कोणतीच नाही. ते सर्वशक्त त्या सत्याला माहित नसलेले कोणतेच विषय नाहीत. ते सर्वज्ञ . असे महासत्य जाणून घेण्यासाठी जगांतील थोर तत्वज्ञानी महापुरूषांनी अनुभावि शराणांनी आपले संपूर्ण जीवनच समर्पित केले.पाहणारे डोळे असतील तर याच जगांत सत्य निखळपणे दिसेल. या अर्थाची एक सांकेतिक कथा अशी.

चौघे स्नेही होते. त्याची नांवे डोळा, कान, नाक, आणि हात. त्यांची मैत्री अत्यंत गाढ. अन्योन्य. एकदां ते आराम करीत बसले असतां डोळ्याला मेघावृत हिमालय पर्वत दिसला. तेथे खोल दरी, नद्या नाले, सृष्टि सौदर्य यांचे वर्णन करून; त्याने आपल्या मित्रांना सांगितले. कानाने ते सर्व लक्ष देऊन ऐकले. पण त्याला हिमालय ऐकूं आला नाही. नाकाने आघ्राण करून पाहिले; त्याला हिमालयाचा वास आला नाही. हाताने इकडे तिकडे चाचपडून पाहिले. त्याला हिमालय हाती गवसला नाही. ते सर्वजण डोळ्याला म्हणाले, ''आम्हांला तो हिमालय कानांना ऐकू आला नाही. हाताला गवसला नाही, नाकाला त्याचा गंध नाही. त्यामुळे तूं ज्या हिमालया विषयी सांगतोस तो निव्वळ भ्रम असला पाहिजे.''

तेंव्हा डोळा हंसून म्हणाला, ''मित्रानो, हिमालयाच्या त्या उत्तुंग पर्वत शिखरांना कानांनी ऐकायचे नसते. नासिकेने आघ्राण करायचे नसते. येथूनच हाताने स्पर्श करायचे नसते. डोळे उघडून त्याला डोळ्यांनी पाहिले पाहिजे..

आपल्या अंतरंगाचा डोळा-ज्ञान चक्षु उघडून पाहिले तरच ब्रह्म रूपी हिमालय...महासत्य रूपी पर्वतराज दृष्टिगोचर होईल. सत्य ज्ञान होईल.

त्या परम सत्याला जाणून त्याचा अनुभव घेतला संतांनी. ''सत्य दर्शिन:संत:'' संतांच्या जीवनांतील त्यांचे आचरण हाच सदाचार ! जगांतील सर्व संतांच्या जीवनाचे अवलोकन केले असतां, त्या सर्वांच्या जीवनांत एक सामान्य गोष्ट आढळते. जीवनाच्या कोठल्याही प्रकारच्या प्रसंगात ते सदा संतुष्ट ! महाज्ञानी सॉक्रटिस कुरूप होता. शांति दूत गौतम बुध्द सुस्वरूप होता. संत तुकाराम अत्यंत गरीब होता. आत्मज्ञानी जनक राजा होता. पण ते सर्वजण संतुष्ट होते. श्रीमंती, गरीबी, सुस्वरूप, कुरूप यापैकी कोठलेही संताच्या आत्मानंदांत बाधा आणूं शकले नाही.

एक आंग्ल कवि. तत्वचिंतक सत्य-सौंदर्याचा आराधक. संतृप्ति विषयी म्हणतो, ''संतृप्ति हा क्रियात्मक, विधायक, रचनात्मक सद्गुण होय !''

ही संतृप्ति कोणती? हे सांगतां येत नाही. याचा अनुभव घ्यायला हवा. परम सत्याकडे ज्याचा कल असतो. ते सदा संतुष्ट असतात. संतृप्त असतात. संपत्ति, स्थान-मान वगैरे प्रापंचिक विषयांत आपण सदा मग्न असतो. त्यामुळे आपण जीवनांतील सहज संतृप्तिपासून वंचित असतो. प्रपंचात गुंतलेले आपले लक्ष थोडेसे परमात्म्याकडे-सत्याकडे वळविले तर आम्ही सुध्दा संतांप्रमाणेच सदा संतुष्ट ! आमचे जीवन भव्य ! दिव्य !!

पंडित मदन मोहन मालवीय मोठे विद्वान बनारस हिंदू विश्वविद्यालयाचे संस्थापक. ते भारतीयांना व ब्रिटिशांना सुध्दां आदरणीय. सौजन्याची साकार मूर्ति ! त्यांचे वडील मोहन मालवीय संत हृदयी.मोहन मालवीयजी हरिकथा करून आपले जीवन कंठीत

असत. ते सत्याचे आराधक. श्रीमंतीकडे त्याचे लक्ष नसे. हरिकथा करून जेवढे मिळेल त्यावरच ते संतुष्ट असत. त्यामुळे त्यांची गरीबीतून मुक्तता झाली नाही. एकदां घरांत कांहीही नव्हते. स्वयंपाक घर थंड होते. बालक मदनला भूक लागली. भुकेने व्याकुळ होऊन तो झोपी गेला. मुलाचे तळमळणे पाहून त्याची माता आपल्या पतीला म्हणाली, ''तुम्ही-आम्ही जाणते आहोत. कसेतरी भूक सहन करूं शकूं; पण या बाळासाठी तुम्ही कांहीतरी मागून आणूं नये काय?''

मोहन मालवीय म्हणाले, ''आमचे घराणे गौरवपूर्ण ! आम्ही कधीही कोणापुढेही हात पसरून मागणार नाही. आमच्या नशीबी जे कांही असेल ते आपण अनुभवले पाहिजे. पाहूंया तो भगवंतच यांतून कांहीतरी मार्ग दाखवील !'' तेवढ्यांत एक माणूस आला. म्हणाला, ''आमच्या यजमानांनी तुम्हाला हरिकथेला बोलाविले आहे !''

मोहनजी संतोषाने त्या श्रीमंताच्या घरी हरिकथेला गेले. मोठ्या भक्तिभावाने त्यांनी हरिकथा सांगितली. भक्ति रसाचा जणूं महापूर आला. यजमानाने संतुष्ट होऊन शंभर रूपयांची दक्षिणा दिली. त्यापैकी फक्त पांच रूपये घेऊन मालवीयजींनी बाकीचे पंच्यानऊ रूपये त्या श्रीमंताला परत् दिले.

तो यजमान म्हणाला, ''मालवीयजी, हे सगळे पैसे तुम्हालांच दिले आहेत.''

मालवीयजी म्हणाले, ''मी जी हरिकथा केली, त्यासाठी पांच रूपये पुरेत. मला अधिक पैसे कशाला हवेत?''

तो धनिक म्हणाला, ''तुमच्या प्रपंचात वेळप्रसंगी उपयोगी पडतील. म्हणूनच मी येवढे पैसे दिले आहेत. अनमान करूं नका. घ्या ते पैसे''

मालवीयजी म्हणाले, ''यजमान राग मानूं नका. तुम्ही संपत्तीने

श्रीमंत. मी संतोषाने श्रीमंत ! देव मला जेवढे देईल त्यांतच मी संतुष्ट आहे.''

तो धनिक म्हणाला, ''मी केवळ संपत्तीने श्रीमंत आहे असे नाही तर त्यागाने सुध्दा तितकाच श्रीमंत आहे. एकदां तुम्हाला दक्षिणा म्हणून दिलेले, तुमच्या हस्तस्पर्शाने पवित्र झालेले धन मी परत घेऊं शकत नाही''

''आम्हा दोघांनाही नको असलेले हे धन आपण सत्कार्यासाठी खर्च करूं या !''मालवीयजी म्हणाले.

आहे त्यांत संतुष्ट होऊन असणें हे संतांचे लक्षण. हा खरा सदाचार. त्यामुळे जीवन नित्य संतोष सागर. हाच आनंद योग होय. परम सत्यदर्शी संतांनी आपणांस दाखविलेला आनंद पथ ! धन-संपत्ति, स्थान-मान, गौरव, पदवी कांही नसले तरी सत्याचे आराधक सदा संतुष्ट असतात.

लाओत्से चीन देशांतील एक महान संत ! नि:संग...निरिच्छ एकदां तो झाडाखाली बसला होता. एक माणूस त्याच्यापाशी आला. म्हणाला, ''आपण थोर संत आहांत. आपली कीर्ती देशभर पसरली आहे. आपले नांव ऐकून राजे महाराजे भक्तिभावाने आपले शिर झुकवतात. पण आपणाला रहायला एखादे घर सुध्दा नाही ना?''

लाओत्से म्हणाला, ''होय मला घर नाही. हे सांगितल्याबद्दल मी तुमचा आभारी आहे.पण तुम्ही कृपा करून येथून ताबडतोब निघून जावे !''

''कां बरे !'' त्या माणसाने विचारले

''कारण माझ्या उणीवा ऐकायची मला इच्छा नाही.'' लाओत्से म्हणाला.

श्रीमंती-संपत्ति, विद्या-बुध्दि वगैरे प्रापंचिक वस्तु देवाने ज्याला त्याला दिल्या आहेत. आपल्याला जेवढे लाभले त्यांतच आपण

संतुष्ट होऊन असावे. सर्वांजवळ सर्व कांही असावे; हे भ्रमात्मक नव्हे काय? शेजाऱ्याचे घर पाहून आपल्या घरांतील उणीवांची आपण यादी करूं नये. बाजारांतील सर्व वस्तु घरांत आणल्या तर घर घर होऊन रहात नाही. ते सुध्दा एक बाजारच होते. संतुष्ट जीवनाला सत्यज्ञान ज्यांना झाले; अशा संतांचे संतृप्त जीवनच आदर्श होय!



# १९ खरी संपत्ति

धन-धान्य, शेती-वाडी, घर-दार ही बाह्य संपत्ति. त्यामुळे माणसाचे बाह्यजीवन समृध्द. आपले वागणे-बोलणे, आचरण सत्य शुध्द असावे. तेथें परमात्माच प्रकट व्हावा. हाच सदाचार. हीच खरी संपत्ति.हीच अंत: श्री ! त्यामुळे आपले अंतरंगाचे जीवन समृध्द ! ही सदाचाराची संपत्ति ज्याच्यापाशी आहे तेच संत. ते सदा संतुष्ट असतात. संतोष हाच त्यांच्या जीवनाचा मूळाधार.

सॉक्रेटिस ग्रीस देशाचा महान संत. अथेन्स नगरांत रहात होता. तो फारसा शिकलेला नव्हता. पण मोठा बुध्दिमान ! देह म्हणावा तसा सुंदर नव्हता. पण शरीर सुदृढ ! घरांत संपत्ति नव्हती. पण त्याच्या हृदयात आशासुध्दां नव्हती. तो सुतारकाम करीत असे. त्या काळचा तो मोठा आध्यात्मिक संत होता. तो श्रीमंती विषयी म्हणतो,

''श्रीमंत व्हायचे असेल तर माणसाने संतुष्ट असावे. तृप्ति नसलेली संपत्ति म्हणजे दारिद्र्याचे लक्षण''

या जगांत श्रीमंत असूनही दरिद्री असणारे लोक फार आहेत. पण दरिद्री असूनही श्रीमंत असणारे फारच विरळ. आपण वरवरचे श्रीमंत.आंत आपण गरीबच ! राजवाड्यासारखा भव्य सुंदर वाडा पण त्या वाड्यांत राहणारा राजा डोके धरून बसला आहे. घरभर अन्न आहे. तिजोरीत सोने-नाणे भरले आहे पण

डोक्यांत खिन्नता भरली आहे.ही खरी संपत्ति नव्हे.

"घर पहावे तर गरीबांचे . मन पहावे तर श्रीमंतांचे" या वचनांत बसवेश्वरांनी खऱ्या संपत्तीचे वर्णन केले आहे. साधुसंतांचे घर गरीबीचे असले तरी ते मनाने श्रीमंत होत. आपले घर मोठ्ठे. मन मात्र लहान. साधुसंतांचे घर फारच लहान असले तरी मन मात्र जगायेवढे...आकाशायेवढे ! त्यांच्या मुखावर प्रसन्नता मनांत संतोष. तेच खरे श्रींमंत. संतोष, संतृप्ति हीच त्यांची संपत्ति !

वाल्मिकी महर्षि. अरण्यांत रहात असे. त्याच्या डोळ्यांत रामायण अमर काव्याचे दिव्य सौंदर्य भरले होते. हृदयांत माधुर्य. मनांत प्रभु रामचंद्राचे चरित्र. जिभेवर रामायणाच्या रसमय वाग्गंगेचे श्लोक. गणपति आदि देव संतुष्ट होऊन त्याच्या पुढ्यांत प्रत्यक्ष उभे राहिले. काय वाटेल तो वर मागायला सांगितले.

"कांही नको" वाल्मिकी म्हणाले, "मी सांगितलेले श्लोक तेवढे लिहून घ्या ! पुरे !"

केवढे संतुष्ट हृदय हे ! हे संतांचे लक्षण !

आम्हाला जर तो विघ्नेश्वर प्रसन्न होऊन "वर माग !" असे म्हणाला असता; तर ज्याच्यापाशी मोठे राज्य-संपत्ति भरलेली आहे, अशा राजा महाराजांनी सुध्दा अहमहिकेने आपापल्या मागणीची मोठ्ठी यादीच देवा पुढे ठेवली असती. आमच्या मागण्या त्या विघ्नेश्वरापुढे कदाचित विघ्न होऊन उभ्या राहिल्या असत्या.

एक जीर्ण झोपडी. फाटके कपडे नेसलेली एक माता. तिचे लहानसे बाळ. पती दिवसभर राबून थकून भागून झोपी गेला आहे. पहाटे पत्नी जागी होते. पाळण्यांत बाळ खेळत असते. बाळाला पाहून मातेचे हृदय वात्सल्याने ओसंडून वाहू लागते. तिच्या मुखांतून रामाचे गी त प्रकट होऊ लागते. तिचे बाळच राम! जीर्ण झोपडीच राजवाडा. तिचा पतीच दशरथ राजा. त्या झोपडीत जणूं स्वर्गच अवतरतो. जेथे

संतोष, तेथेच स्वर्ग!

बोंतादेवी काश्मीरची महाराणी. आपल्या राज्याची संपत्ति-राजवाडा-सुखी जीवनाचा त्याग करून ती कल्याणला आली. रेशमी कपडे-दागदागिने यांचा त्याग करून एक वाकळ पांघरून निघाली.

भगवंताच्या दिव्य सृष्टिमध्ये समरस होऊन आत्मानुभवाची काव्ये रचीत ती निघाली. पूर्वी ती रेशमी वस्त्र नेसत असे. आतां ती वाकळ पांघरू लागली. पूर्वी राजवाड्यांत मिष्टान्न भोजन. आतां वाटेत मिळेल ते भिक्षान्न. तरी पण आत्मानंदाला मुळीच तोटा नव्हता.

एके दिवशी एका साधकाने कुतूहलाने विचारले, ''बोंतादेवि, आपण राजघराण्यांतल्या! आपले पूर्वीचे राजवैभव कोठे? आणि आजचे हे कष्टमय दरिद्र जीवन कोठे?''

बोंतादेवी म्हणाली, ''पूर्वीचे राजवाड्याच्या बंधनांत सापडलेले जीवन कोठे? आतांचे मुक्त-स्वतंत्र जीवन कोठे? हे भाऊ तूं म्हणतोस ते खरे आहे. पण उलट्या अर्थाने''

ही हृदयाची श्रीमंती. खरी संपत्ति! आपल्याजवळ जे आहे, त्यांतच आनंद मानणे हेच संतांचे लक्षण! संतोषाचे सूत्र!!

आपल्याजवळ झाडावर उमललेले साधे फूल आहे. त्याची किंमत एक रूपयाहून अधिक नाही. दुसऱ्यांपाशी सोन्याचे फूल आहे. त्याची किंमत लाखो रूपये. पण त्या सुवर्ण पुष्पाला सुगंध नाही. कोणीतरी ते चोरून नेतील हे भयही त्यांत आहे. साध्या फुलामध्ये सुगंध आहे. चोरभय नाही. याचा संतोष आपणं बाळगावा. आपणांपाशी लाख रूपये मोलाचे सुवर्णाचे फूल असले तरी त्याला विसरून नैसर्गिक फुलाच्या सौंदर्यात आपण समरस व्हावे.

त्याने सुवर्णाला सुगंध लाभतो. हीच खरी संपत्ति होय!



# २० औदार्य

संतांच्या जीवनांता आढळून येणारे आचरणच सदाचार होय! हा अनुकरणीय. सत्यदर्शन नित्यानंदाची ज्यांना इच्छा आहे, ते धार्मिक! आपली इच्छा पूर्ण होण्यासाठी त्यांनी संतांना संमत अशा सदाचाराचे आचरण करावे. संतांचे अनुकरण करावे. संतांना अत्यंत प्रिय संतोष अथवा संतृप्ति याविषयी आपण चर्चा केली आहे. आतां संतांचा आणखी एक महत्वाचा गुण 'औदार्य' या विषयी चिंतन करूं या!

संत हे परम अनुभावि, महात्मा. ज्याचा आत्मा महत्तम असतो, तो 'महात्मा' या 'महात्मा' पदामध्येच त्यांचे गुण वर्णन आहे. 'आत्म' पद अनेक अर्थांनी संपन्न आहे. या संदर्भात 'आत्मा' पदाचा विशेष अर्थ म्हणजे हृदय, मन अथवा भाव. ज्यांचे हृदय, मन अथवा भान महान आहे; ते महात्मे. आपले हृदय फारच लहान. त्यामुळे आपण अल्पात्मा! आपल्या हृदयांत स्वजन, आपले शेत, घर यांनाच स्थान आहे. महात्म्यांचे हृदय विश्वायेवढे विशाल. त्याला भिंती नाहीत. सीमा नाहीत. समस्त जगालाच तेथे अवकाश आहे.

सुमारे अडीच हजार वर्षापूर्वी अरिस्टॉटल या नांवाचा संत ग्रीस देशांत होऊन गेला. तो ग्रीक तत्वज्ञानाचा जनक. सम्राट अलेक्झांडर चा गुरू! तो म्हणतो, "मी अथेन्स नगराचा अथवा ग्रीस देशाचा नागरिक नव्हे. मी विश्वाचा नागरिक!"

भारतीय ऋषि-मुनी याहून अधिक सुंदर रातीने सागतात,

''वसुधैव कुटुंबकम्!'' हे समस्त भूमंडलच माझे घर. जगांतील सर्व माणसे माझे बंधु-बांधव. ''केवढा हा मधुर भाव ! संतांचे हृदय विश्वा येवढेच विशाल !

या जगांत जे जे चांगले आहे, त्याचा आपण आदर करावा. ते आत्मसात करावे. हेच औदार्य होय. येथे सवासिक फूल, गोड पाण्याने भरलेली घागर, मंगलदीप आहे. आपण त्याची महति जाणून घ्यावी. त्याच्या सद्‌गुणांचे ध्यान करावे. ते सोडून, हे फूल, ही घागर, हा दिवा कोणाच्या मालकीचा आहे? त्यांची जात कोणती? ते गरीब आहेत की श्रीमंत आहोत? असा भेदभाव मनांत आणणे हे औदार्याचे लक्षण नव्हे. फूल पाणी, दिवा कोणाचे असले तरी काय? ते जो सुगंध देतात, संतोष देतात. प्रकाश देतात. तो सारखाच असतो ना? हे सौंदर्याचे संतोषाचे प्रतीकच आहेत ना?

आपण विद्यार्थ्याने लिहिलेल्या उत्तर-पत्रिकेचे मूल्यमापन करीत असतो. आपणांस त्या उत्तर पत्रिकेतील विषय-विद्या येवढीच दिसावी. ते सोडून ''त्या विद्यार्थ्याची जात कोणती? त्याचे कुल कोणते? गोत्र कोणते? तो आपला की परका?'' असे विचार आपल्या डोक्यात येऊ नयेत. तसे विचार आपल्या मनांत येत असतील तर आपल्या ठिकाणी औदार्य नाही. या जगांत औदार्याची फार मोठी कमतरता आहे

एकलव्य एक तेजस्वी बालक. पाणीदार डोळे, स्वच्छ हृदय, सदृढ देह. धनुर्विद्या शिकण्याची त्याला इच्छा झाली. त्याने आपल्या मातेला विचारले ''धनुर्विद्या शिकविणारे योग्य गुरू कोण आहेत?''

माता म्हणाली ''या देशांत द्रोणाचार्यासारखा धनुर्विद्येत प्रवीण गुरु दुसरा नाही. तूं त्यांच्याकडेच धनुर्विद्या शिकायला जा''.

द्रोणाचार्यांनी शिष्य म्हणून एकलव्याचा स्वीकार केला नाही. कारण तो क्षत्रीय नव्हता. निषाद होता.

''माझा तुला पूर्ण आशिर्वाद आहे. तुझी इच्छा पूर्ण होओ''

असा आशिर्वाद देऊन द्रोणाचायाने त्याला कांहीही न शिकवतां परत पाठविले. एकलव्याने मोठ्या भक्तिभावाने एका वृक्षाखाली द्रोणाचार्यांची प्रतिमा बनविली. आपण मोठ्या श्रध्देने धनुर्विद्या साधना सुरू केली. मनांत गुरु मूर्तीचे ध्यान करीत; हाती धनुष्य बाण घेऊन; अंतरंगी आपला गुरू आपणच होऊन; आपणच शिष्य होऊन; रात्रंदिवस परिश्रम करून धनुर्विद्या साधना केली. एके दिवशीं त्याला शब्दवेधी विद्या अवगत झाली. शक्तीचा समुचित प्रयोग करून प्राण्यांना इजा न करतां त्यांना काबूत ठेवणारी विद्या त्याला लाभली.

एकलव्य मोठ्या आनंदाने माते जवळ गेला. त्याने आपली साधना तिला सांगितली. मातेला अपार आनंद झाला. ती म्हणाली, ''या अहिंसक अमृत विद्येने या अरण्यांतील सर्व प्राणि सुखाने नांदोत !''

एके दिवशी एकलव्याच्या धनुर्विद्येच्या परिक्षेचा काळ आला. द्रोणाचार्य कौरव पांडवांना घेऊन अरण्यांत संचाराला निघाले होते. त्यांच्या समवेत कांही शिकारी कुत्री होती. अरण्यांत आल्यानंतर ती कुत्री सतत भुंकू लागली. एकलव्याने आपल्या एकाग्रतेचा भंग होऊ नये म्हणून शब्दवेधी बाणांचा प्रयोग केला. कुत्र्यांच्या तोंडात हे बाण जाऊन अडकले. त्या कुत्र्यांचे भुंकणे बंद झाले. पण त्यांना कसलीच इजा झाली नाही. अर्जुन द्रोणाचार्यांचा परम शिष्य. त्याला जगांतील सर्वश्रेष्ठ धनुर्धर करण्याचा विडा द्रोणाचार्यांनी उचलला होता. तो फारच दु:खी कष्टी झाला.

सर्वजण एकलव्यापाशी आले. आपले मानस गुरू आपणाकडे येत आहेत हे पाहून एकलव्य धावत जाऊन त्यांना वंदन करू लागला. द्रोणाचार्यानी विचारले ''या कुत्र्यांवर तूंच बाण-प्रयोग केंलेस काय?''

''होय आचार्य !'' एकलव्य म्हणाला

''ही विद्या तुला कोणी शिकविली?'' द्रोणाचार्यांनी विचारले.

''गुरू महाराज, मी ही विद्या आपणांपाशीच शिकलो'' एकलव्य म्हणालां.

त्याने झाडाखाली बनविलेली गुरू द्रोणाचार्यांची प्रतिमा दाखविली.

द्रोणाचार्यांसह सर्व कौरव पांडव आश्चर्यचकित झाले.

''अशी विद्या आपण मला नाही शिकविली गुरूदेव'' अर्जुन पुटपुटला.

''गुरूदेव आपल्या मूर्तिपासून प्रेरणा घेऊनच मी ही विद्या शिकून धन्य झालो'', एकलव्य म्हणाला.

''तर मग मला गुरूदक्षिणा देणार नाहीस काय?'' द्रोणाचार्यांनी विचारले.

''आपण सांगाल ती गुरूदक्षिणा देण्यास मी सिध्द आहे'' एकलव्य म्हणाला.

अर्जुन जगांत सर्वश्रेष्ठ धनुर्धर झाला पाहिजे असा विचार करून द्रोणाचार्य म्हणाले, ''तूं तुझ्या उजव्या हाताचा अंगठा कापून मला गुरूदक्षिणा म्हणून दे!''

श्रेष्ठ धनुर्धारी ज्या उजव्या हाताच्या आंगठ्यावरच पूर्णपणे अवलंबून असतो, तो आंगठा मागून द्रोणाचार्यांनी जणूं काही एकलंव्याचे प्राणच मागितले. क्षणाचाही विलंब न करतां श्रध्दाळु एकलव्याने आपल्या उजव्या हाताचा आंगठा कापून गुरूचरणीं अर्पण केला. जगांतील अहिंसक अमृत विद्या नष्ट पावली.

द्रोणाचार्य महान अनुभावी परमाचार्य! पण क्षणभर त्यांच्या डोळ्यांसमोर अंधार पसरला होता. त्यांचे हृदय फारच संकुचित झाले. अर्जुना वरील मोहाने द्रोणाचार्यांचे औदार्य क्षणांत नष्ट झाले.गुरूत्व राहिले नाही. द्रोणाचार्यांना पश्चाताप झाला. पण वेळ निघून गेली होती.

आपले सुध्दा तसेच होते. दोघे भाऊ-भाऊं. एकच घर. एकच दार. मध्ये कुडाचा पडदा. इकडे थोरला भाऊ, तिकडे धाकटा भाऊ. थोरल्या भावाची पत्नी माहेरी गेलेली असते. अन्न रांधायच्या प्रयत्नांत थोरल्या भावाचे हात पोळतात. ते पाहून धाकटा भाऊ आणि भावजय कुचेष्टेने हंसत असतात.

थोरल्या भावाला जेवायला बोलवावे. अथवा त्याला जेवण करून पाठवावे. असा विचार धाकट्या भावाच्या अथवा भावजयीच्या मनांत येत नाही.

आपले हृदय ...आपले मन येवढे संकुचित झाले आहे. आपण 'अल्पात्मा' झालो आहोत.

आपल्या घरांत मुलगा आणि मुलगी वयांत आलेले असतात. आपण देवळांत जाऊन देवाची प्रार्थना करतो. देवा आमच्या घरी सून होऊन येणारी खूप संपत्ति आपल्या बरोबर आणूं दे ! घर भरूं दे ! पण जांवई म्हणून आपल्या घरी येणारा कांहीही मागूं नये ''

सुनेने आणावे. लेकीने नेऊं नये. हा कसला न्याय? मुलगी लग्न होऊन सासरी गेली, तरी आईला सतत आपल्या मुलीची आठवण होते. दुसऱ्यांची मुलगी सून होऊन आपल्या घरी आलेली असते. पण त्या मातेच्या मनांत आपल्या सुनेविषयी यत्किंचित ही प्रेम नसते. घरांत मुलाला दूध, फळे मिठाई. मुलीला केवळ भाजी भाकरी. कारण मुलगा कुलदीपक. घरी वरदक्षिणा घेऊन सून येते. मुलगा जमेची बाजू. मुलगी परक्यांच्या घरी जाते. या घरांतून घेऊन जाते. खर्चाची बाजू ! आपल्या मुलाबाळांना आपल्या भावंडांना आपल्या हृदयांत स्थान नाही. तर मग आपण या देशावर जगावर कसे बरे प्रेम करावे?

सर्वे जना: सुखिनो भवंतु । सर्वे संतु निरामय: ।।
सर्वे भद्राणि पश्यन्तु । माकश्चित् दु:खमाद्भवेत ।।

सर्व जन सुखी असावेत. सर्वजण आरोग्यवान असावेत. सर्वांचे कल्याण होऊं दे ! कोणालाही दु:ख होऊं नये ! सकल जीवात्म्यांचे कल्याण होवो. ''

आपल्या संतांनी-शरणांनी अशी प्रार्थना केली. त्यांचे मन त्यांचा आत्मा येवढा विशाल. म्हणूनच ते महात्मे ! त्यांच्या सदाचरणानेच विश्वशांती समाधान ! हाच आनंदयोग !!



# २१ श्री सागर

या भूदेवीला वसुधा म्हणतात. ऐश्वर्य धारण करणारी असा त्याचा अर्थ. आपल्या देहाला रूप लाभले ते या भूमीमुळेंच. देहाला आवश्यक असे अन्न-पाणी वगैरे मिळतात या मातींतूनच. आपल्या प्राणांचे रक्षण करणारा वारा, पाणी, आपणांस शक्ति देणारे अन्न, चैतन्य-उत्साह भरणारा प्रकाश. यांची किंमत करतां येईल काय? संपूर्ण भूमंडलच सूर्य किरणांनी नित्य स्नान करते. त्या सूर्याचे..दिनकराचे मूल्य किती? असंख्य मोती-रत्ने यांचा आगारच असलेल्या सागराचे मूल्य किती? अशा अनेक सागरांना आश्रय देणारे ग्रह असंख्य ! आपल्या सभोवती अपार-संपत्ति पसरली आहे. या विश्वामध्ये संपत्तीचा अपार सागरच पसरला आहे. त्याचे ज्ञान नसल्याने आपण गरीब झालो आहोत. या विश्वाच्या संपत्तीची महती जाणली संतांनी. म्हणूनच एकही संत स्वत:ला गरीब समजत नाही.

एक मातीची पणति. दुसरी सोन्याची समई. पणतीची किंमत एक रूपया. समईची किंमत एक लाख रूपये. एक माणूस त्या पणतीला म्हणाला, ''तूं किती गरीब आहेस !''

पणती म्हणाली, ''माणसा, मी गरीब कां? माझा प्रकाश आणि त्या सोन्याच्या समईचा प्रकाश सारखाच. आम्ही दोघेही प्रकाश श्रीमंत !''

नाशवंत देहाकडे पाहिल्यास आपण गरीब. शाश्वत अशा आत्मज्योतीकडे पाहिल्यास आपण सर्व श्रीमंतच! भगवंताने अपार

संपत्ति आपणांस दिली आहे. ते न जाणल्याने आपण गरीब; असे आपणं समजलो.

डायोजिनिस महान संत. निराभारी. अंगावर एक लंगोटी. हाती काठी. दुसऱ्या हाती भिक्षा पात्र. पाठीमागून येणारा एक कुत्रा. ही येवढीच त्याची संपत्ति होती. एके दिवशी डायोजिनिस उन्हांत अंग शेकत बसला होता. त्या ठिकाणी सम्राट ॲलेक्झांडर डायोजिनिसच्या दर्शनाला आला.

''मी सम्राट ॲलेक्झांडर'' राजाने आपली ओळख संताला करून दिली. आणि डायोजिनिसनां वंदन करून हात जोडून उभा राहिला.

''मी आपली काय सेवा करूं शकतो?'' ॲलक्झांडरने विचारले. ''तूं थोडासा बाजूला हो. तुझी सावली माझ्यावर पडते आहे. उन सोड'' संत म्हणाला. या भूमंडळाला उजळविणाऱ्या सूर्याच्या प्रकाशापुढे सम्राटाचे वैभव क: पदार्थ ! विश्वाच्या सत्य श्री संपत्तीची महती जाणणारे संत आपल्या नश्वर संपत्तीकडे आकर्षित होतील काय?

ते एक गरीब कुटुंब. पती-पत्नी-एक लहना मुलगा. मोल मजूरी करून जीवन कंठीत असत. दिवसभर तो राबून घरी येई. संध्याकाळी पती-पत्नी जेवून खाऊन बाळाशी खेळत आनंदात वेळ घालवीत असत. संध्याकाळी झाडाखाली बसून तो संत हृदयाचा मजूर भक्तिगीते गात असे. स्वच्छ हृदयांतून स्फुरलेली ती सुमधर भक्तिगीते ! नित्य शेकडो लोक ऐकून संतुष्ट होत.

एक श्रीमंत होता. त्याला या गरीब मजूराची भक्तिगीते फार आवडली. पण त्याची गरीबी पाहून त्याचे मन कळवळले. एके दिवशी तो श्रीमंत त्या मजूरी करणाऱ्या संताला थोडे पैसे द्यायला गेला. पण त्या संताने परधन स्वीकारायला नकार दिला. निरूपाय होऊन तो श्रीमंत परत गेला. कोणत्या तरी उपायाने त्या संताची गरीबी दूर करावी असे त्या श्रीमंताला वाटले.

तो संत नित्य पहाटे नदीवर स्नान करण्यास जात असे. एके दिवशी त्या श्रीमंताने संताच्या आधीच उठून, तो ज्या ठिकाणी ध्यानस्थ बसत असे, तेथे पैशाने भरलेले एक मडके ठेवून दिले. संत नेहमीप्रमाणे स्नान करून देवाचे ध्यान करून परत आला. त्या श्रीमंताने आंडाला राहून पाहिले. संताने त्या पैशाने भरलेल्या मडक्याला स्पर्शसुध्दा केलेला नव्हता.

श्रीमंताने वाटेत त्या संताला गाठले, ''तुम्ही ध्यानस्थ बसत असल्या ठिकाणी एक पैशाने भरलेले मडके होते ना?''

''होते'' संत म्हणाला.

''ते पैशाने भरलेले होते. तुम्ही त्याला हात सुध्दां लावला नाही. कां बरे ?'' श्रीमंताने विचारले.

''कोणाचे तरी धन घेण्याइतका मी गरीब नाही !'' संत म्हणाला. संताचा सदाचार...निर्लोभी गुण पाहून त्या श्रीमंताचे मस्तक श्रध्देने झुकले.

संत तुकाराम अत्यंत गरीब. आपले सर्वस्व गमावून ज्याचे हात मोकळे होतात, त्याला 'तुकाराम' असे नांव देतात. असे संत तुकाराम. छत्रपती शिवाजी मंहाराजांनी खूप धन भेट म्हणून पाठविले असतांना त्या धनाचा अव्हेर करणारा संत तुकाराम ''विष्णुदास आम्ही...सर्वाहुनी श्रींमत !'' म्हणत असत. संतांच्या हृदयी असलेल्या आत्मविश्वासाचे ते बळ.

''सासऱ्या कडून वरदक्षिणा-वरोपचार मागण्याइतका गरीब मी नव्हे'' असे म्हणण्याचा आत्मविश्वास..असे धैर्य आपल्या तरूणांत येईल काय?

देव असुर यांनी समुद्र मंथन केले. त्यांतून चौदा रत्ने निघाली. इंद्र ऐरावत घेऊन गेलां. विष्णु लक्ष्मीला घेऊन गेला. तरीपण त्यांची हांव सुटली नाही. गरीबी हटली नाही. समुद्रमंथन तसेच पुढे चालले.

त्यांतून सबंध विश्वाला जाळून टाकणारे 'हलाहल' विष उत्पन्न झाले. लौकिक संपत्तीची आशा केली तर त्याचा शेवट असाच होणार. विषमय...विषादमय ! म्हणूनच संत लौकिक संपत्तीची आशा करीत नाहीत.

दोघे भाऊ-भाऊ. लहान वयांत आई-वडील निवर्तले. भिक्षा मागितल्याशिवाय गत्यंतर नव्हते. गावोगांवी फिरून भिक्षा मागून उदर निर्वाह.

एकदां भिक्षा मागून एका गांवाहून परत येत असतां त्यांना वाटेत एक सोन्याच्या मोहोराने भरलेली थैली सांपडली. त्यांच्या पुढुनं एक घोडेस्वार गेलेला त्यांनी पाहिला होता. त्या घोडेस्वाराचीच ती थैली असावी असे त्यांना वाटले. त्यांनी ती थैली उचलून घेतली. थोडेसे अंतर चालत गेल्यावर झाडाच्या सावलीत विश्रांती घेत असलेल्या घोडेस्वाराला त्यांनी पाहिले.

''ही थैली तुमचीच ना?'' त्या बालकांनी घोडेस्वाराला विचारले. घोडेस्वाराने आपली थैली ओळखली. अनायसे लाभलेली अपार संपत्ती परत करण्यास आलेल्या त्या भिक्षुकंना पाहून घोडेस्वारास फारच आश्चर्य वाटले. त्याचे हृदय विरघळले. तो म्हणाला, ''ही थैली माझीच आहे. पण तुमचा प्रामाणिकपणा पाहून मला फारच संतोष झाला आहे. ही थैली तुम्हीच ठेवून घ्या !''

बालक म्हणाले, ''यजमान तुमचे औदार्य पाहून आम्ही तुमचे आभारी आहोत. ! पण दुसऱ्यांचे धन घेण्याइतके आम्ही गरीब नाही.'' ते बालक भिक्षुक खरे. पण हृदय केवढे श्रीमंत !

एक चिमणीचे घरटे. चिमणीने घरट्यांत अंडी घातली होती. अंड्यांतून पिले बाहेर पडायची वाट ती चिमणी पहात होती. एकदां तिला आपल्या घरटयांत एक सोन्याची साखळी दिसली. तिने इकडे तिकडे पाहिले. ''कोठून आली ही सोन्याची साखळी?''

वरच्या फांदीवर एक कावळा बसला होता. ''तुझ्या पिलांच्या पालन पोषनासाठी मीच ती सोन्याची साखळी तुझ्या घरट्यांत टाकली.''

''माझ्या पिलांना डोळे उघडतांच देवाची ही पवित्र सृष्टि दिसावी. मी माझ्या स्वत:च्या चोचीने गवताची काडी आणून बनविलेल्या या घरट्यांत वात्सल्य असावे. नश्वर संपत्तीचा मोह माझ्या पिलांना नको'' असे म्हणून त्या चिमणीने तो सोन्याचा हार फेकून दिला.

झाडाखाली एक माणूस हे सर्व पाहात उभा होता. त्याने चटकन तो हार उचलून खिशांत टाकला. माणसांचा सहवास केलेल्या त्या कावळ्याला सुध्दा नश्वर संपत्तीचा व्यामोह झालेला होता.

सृष्टि श्री-सागरावर स्वच्छंद विहार करणारी चिमणी संतोषाने राहत होती.

हे विश्व अमर श्री-संपत्तीचा सागर. हे सत्य ओळखून संतांनी कधीही 'आपण गरीब आहोत' असा विचार केला नाही. ते सदा संतुष्ट संतृप्त राहिले. संतांचा हा सदाचारच आनंद योगाचे मूळ होय !



# २२ प्रसन्नता

संत सदा संतुष्ट. नित्य तृप्त. उदार हृदयी. 'आपण गरीब आहोत ' असे त्यानां कधीच वाटले नाही. हा संतांचा सद्गुण, सदाचार. याविषयी आपण आतांपर्यंत चिंतन केले. आतां संतांचा आणखी एक गुण, प्रसन्नता या गुणांविषयी आपण चिंतन करूं या ! उमललेल्या फुलाप्रमाणे संत सदा प्रसन्न चित्त !

माणसांतील भेद-दृष्टि नाहीशी झाली असतां त्याचे जीवन प्रसन्न होते. संतांना दिसतो तो एक सत्य देव. त्याहून वेगळे त्यांना दिसत नाही. त्यामुळे ते सदा संतुष्ट असतात. प्रसन्न असतात. अनंत अवकाशाकडे लक्ष देणाऱ्यांना या जगांत भेद दिसत नाही. भिंती निर्माण करणाऱ्यांना मात्र सर्वत्र भेद दिसतो. संत सदा सत्य रूपी अवकाशाकडे ध्यान देतात. त्यांना या जगांत भेदभाव नसतो. आपण जाति-मत, पंथ, स्त्री-पुरूष अशा भिंती निर्माण करतो. कधी न तुटणाऱ्या भेद-भावाच्या जाळ्यांत गुरफटून गेलो आहोत.

ऊर ओळगण बयलु, ऊर होरगण बयलेंदुंटे ?<br>
ऊरोळगण ब्राह्मण बयलु, ऊर होरगे होले बयलेंदुंटे?<br>
एल्लि नोडिदडे बयलोंदे<br>
भित्तियिंद ओळेंहोरगेंब नाम वैसे<br>
एल्लि नोडिदडे करेदडे ओ एंबातने बिडाडी

महासंत बोंतादेवीच्या वरील वचनांत अभेद दर्शन आहे. गांवांत कुलीन लोकांचे आकाश, गांवाबाहेर हीन कुळांतील लोकांचे

आकाश, असे आकाश वेगवेगळे आहे काय? समस्त विश्वाला आश्रय देणारे महा अवकाश एकच आहे ना? तनु-मन इत्यादि भिंती आपण विसरावे. तेंव्हा तुम्ही-आम्ही सर्व एकच ! पण आम्ही शेकडो भिंती बांधल्या आहेत. हे त्यांचे अवकाश, हे आपले अवकाश असा भेद आपण केला. एकाच घरांत कितीतरी भिंती बांधल्या. देवघर, स्वयंपाक घर, बाहेरचा सोपा, माजघर असे एकाच अवकाशांत अनेक भाग केले. देवघर अत्यंत पवित्र, श्रेष्ठ. बाहेरचा सोपा कनिष्ठ. आंगण त्याहून कनिष्ठ. असा भेदभाव आपण निर्माण केला. घंटानाद करून आंतल्या देवानां बाहेर हांकून बाहेरचा देवांना घरांत आणले.

''घरांतले देव श्रेष्ठ. बाहेरचे देव कनिष्ठ' असा भेद आपण केला. एका देवाच्या भेटीला दुसऱ्या देवाला नेण्याचे साहसही आपण केले. ''देवाला देणगी दिल्याने देव संतुष्ट होतो. प्रसन्न होतो; नाहीतर आपणांवर रागावतो, शाप देतो.'' अशा प्रकारच्या विचित्र कल्पना आपण केल्या.

आल्बर्ट आइनस्टीन यांनी जगाला सापेक्ष सिध्दांत दिला. सत्य देवाविषयी आइन्स्टीन म्हणतात,

''मिती नसलेले अनंत असे परम सत्यच देव होय !''

देवामध्ये आंत-बाहेर , श्रेष्ठ-कनिष्ठ असा भेद नाही. तो आम्हांला त्रास देऊन कांहीही मागत नाही. तो रूसून दूर जाणारा नव्हे. प्रसन्न होऊन जवळ येणार नव्हे. त्याच्याहून वेगळे या जगांत कांहीही नाही. तो देवच आम्ही. आम्हीच तो देव ! तर मग स्त्री-पुरूष, उच्च-नीच अशा भेदभावाला कसे बरे थारा मिळेल? हे अखंड अभेद दर्शन होय. त्यामुळे आपल्या जीवनांत प्रसन्नता. हे अखंड सत्य दर्शन हीच आपली साधना. हाच सदाचार होय.

हे एक फळ. या फळांत वर्ण, आकार, सुगंध, माधुर्य असा फरक वरवर दिसतो. आंत पाहिले तर हे लाखो अणूंचे पुंज. अणु म्हणजे

काय? प्रचंड शक्ति संचय! त्या अणूहून पलिकडे पाहिल्यास केवळ अवकाश...शून्य! त्या शून्यांतून निर्माण झालेल्या फळांत दिसणारा वर्णादि भेद वरवरचा. त्याच्या आंत खोलवर पाहिल्यास केवळ अवकाश. शून्य!

असंख्य चराचर वस्तुंनी बनलेले हे जग वैविध्यमय. वैशिष्ट्यपूर्ण. वर्ण रंजित. क्षणभर डोळे मिटून राहिलो तर बाह्य भेद नाहीसा होतो. ध्यान तसेच पुढे चालू राहिले तर समस्त जग अदृश्य होते. केवळ अंधार तेवढा उरतो. या घनांधकारांतच 'मी' या ज्ञानाची ज्योति उजळते. बाह्य वर्ण आकारादि भेद रहित अखंड सत्य! त्याच्या दर्शनाने जीवनांत चिर-स्थिर प्रसन्नता येते.

आरशासमोर राहून त्यांत आपले प्रतिबिंब पाहून माणूस संतुष्ट होतो. त्याच आरशावर बसून चिमणी आरशांतले आपले प्रतिबिंब पाहून; ते आपले प्रतिबिंब; हे न जाणल्याने व्यर्थ चोच मारून दमते. संत प्रपंचरूपी आरशासमोर उभा राहून आपणच अखंड सत्य हे ओळखतो. परम संतोष मिळवितो. अज्ञानी जीव चिमणीप्रमाणे जगांत भेदभाव कल्पना करून दुःखी होतो.

योगापासून सुख, वियोगापासून दुःख. अखंड, अद्वितीय सत्य वस्तूमध्ये योग ही नाही वियोग ही नाही. त्यामुळे सत्य देव दर्शनाने माणूस सुख-दुःखादी हून अतीत प्रसन्नता मिळवितो. खंडित वस्तु मित सत्य. त्याची मिती नाहीशी करून पाहिले असतां तेच अमित, अनंत, अखंड सत्य होय!

प्रापंचिक मित अशा वस्तुंमध्ये योगही आहे. वियोगही आहे. त्यामुळे तेथे सुख-दुःख दोन्ही आहेत. उदा. मला एक सोन्याचे फूल सापडले तर मला अपार आनंद होतो . तेच सुवर्ण फूल हरवले तर अपार दुःख होते. ज्या वस्तूचा योग होतो ती वस्तु खंडित असते. आज ना उद्यां त्या वस्तूचा वियोग निश्चित. हे सत्य आपणांस आधीच

समजले तर त्या वस्तूंचा वियोग झाला असतां आपणांस दुःख होत नाही. आज मिळालेली सत्तेची खुर्ची एक दिवस आपणांस सोडून देईल. या ज्ञानासह आपण खुर्चीवर बसलो तर त्या खुर्चीवरून उतरताना आपणांस दुःख होत नाही. आपण प्रसन्न चित्त असतो.

विश्वामित्र आणि वसिष्ठ ऋषींनी सीतास्वयंवरांत रामाची व सीतेची गाठ बांधली. तरी पण ती गांठ सुटलीच. रामायण घडले. साक्षात् भगवान विष्णु आणि लक्ष्मीच्या अवतारांची ही कथा. तर मग सामान्य जनांची अवस्था काय? तरी पण नवविवाहित वधुवर आपली ब्रह्मगांठ कधीही सुटणारी नव्हे, कधीही वियोग घडणार नाहीं. असे समजतात.

अखंड सत्याचे दर्शन ज्यांना घडले, तेच संत. ते या प्रपंचातील मिथ्या वस्तूंचा योग-वियोग जाणतात. आपल्या जीवनांतील कोणत्याही योग-वियोगांनी मान-अपमानापायी ते विचलित होत नाहीत.

महात्मा बसवेश्वर बिज्जळ राजाचे प्रधान मंत्रि होते. त्यावेळी कल्याण नगरांत भक्तीचा महापूर आला. विश्वविनूतन समता वादाच्या प्रयोगांत हजारो सत्य-शिव शरण निर्माण झाले. असंख्य अमर वचन साहित्याची निर्मिती झाली. भक्तिरस ओथंबून वाहू लागला.

तेवढ्यात बसवेश्वरांना मंत्रिपद सोडावे लागले.जेवढ्या सहजपणे त्यांनी मंत्रिपदाची वस्त्रे धारण केली तेवढ्याच सहजतेने त्यांनी त्या वस्त्रांचा त्याग केला. कसलेही दुःख न मानतां प्रसन्न चित्ताने त्यांनी कूडल संगमाकडे प्रयाण केले. हे अखंड सत्य-देवाला जाणून घेतलेल्या संतांचे-शरणांचे प्रसन्न जीवन !

आपण कोणत्याही गावांत प्रवेश करू लागतो तेव्हा तेथे एक फलक लावलेला असतो...सुस्वागतम् ! त्या फलकामागे दुसरा संदेश लिहिलेला असतो. ''आपले प्रयाण सुखमय होवो. नमस्कार'' आपण

घाईत असतो. फक्त स्वागत फलकाकडे आपले लक्ष असते. जीवनांत स्वागत समारंभामागेच निरोप समारंभ ही असतो. योगाच्या पाठीमागे वियोगही असतो. मित सत्य वस्तूंनी भरलेल्या जगाचे-प्रपंचाचे हे खरे रूप. प्रपंचात योग-वियोग दोन्ही असतात. हे सत्य जाणून संत कधीही सुख-दु:खामध्ये बुडून जात नाही. या प्रपंचाला परमाधार अशा अखंड-अनंत सत्याचे ज्ञान झाल्याने ते सदा सु-प्रसन्न असतात. हे आनंदयोगाचे संतोष सूत्र होय !



# २३ निर्वैर

धर्म पथांत विचारांपेक्षा आचाराला अधिक महत्व. तसे पाहिल्यास आचारच धर्म ! धर्मच आचार ! आचार अणि धर्म यांना कधीही वेगळे करतां येत नाही. म्हणूनच जगांतील कोणताही संत आचार रहित अथवा आचार भ्रष्ट नाही. द्वैत-अद्वैत, शैव-वैष्णव इत्यादि मत-पंथांमुळे विचारांमुळे हे संत वेगळे, ते संत वेगळे, असे आपण समजतो. कदाचित त्यांचे विचार वेगळे असतील ही. पण आचाराच्या दृष्टीने पाहिले तर जगांतले सर्व संत एकच ! ते नित्य-संतुष्ट, उदार चरित, प्रसन्न ! त्यांचे आणखी एक गुण रत्न म्हणजे संत निर्वैर !

मित्र हा एक अर्थपूर्ण शब्द. सुंदर, सुमधुर मनोभाव. आणखी एक अर्थ असा, मित्र म्हणजे उचलणारा उध्दारक. आपला अध:पात होऊं नये; याची काळजी वाहणारा. आपण धनिक, अधिकारी, समर्थ असंतांना आपल्यां आश्रयाला जो येतो तो खरा मित्र नव्हे. कोणतेही निमित्त अथवा उद्देश नसतांना आपणांवर सहज सदा प्रेम जे करतात ते मित्र !

मकरंद युक्त सुवसिक फूलआपण मोठ्या प्रेमाने उचलून घेऊं. अथवा तिरस्काराने फेकून देऊं. पण हाताला फुलाचा स्पर्श होतांच आपल्या हातांना सुगंध चिकटल्याशिवाय राहणार नांही. संत म्हणजे दैवी साम्राज्यांतील सुंदर सुगंधी दिव्य फूल. लोक संतांचा सत्कार करोत अथवा त्यांचा तिरस्कार करोत. संत मात्र सर्वांनां समान दृष्टीने पाहतात. समस्त जगावर सकल जीवराशीवर प्रेम करतात. ते खरे निर्वैर ! खरे

मित्र !

सूर्याला मित्र म्हणतात. या जगांत लोक सूर्याची स्तुति करोत अथवा निंदा करोत पण तो सूर्य स्तुति निंदेकडे लक्ष न देतां सर्वांना प्रकाश देतो. सूर्याची व फुलाच्या कळीची गाढ मैत्री.. सूर्य प्रचंड, कळी किती मृदु कोमल, मधुर अत्यंत लहान. पण त्यांचा मोठेपणा वा क्षुद्र पणा त्यांच्या मैत्रीमध्ये बाधक ठरला नाही. सकाळ झाली की कळी सूर्याचे दर्शन घेते. सूर्याचे कोवळे किरण त्या कळीला हळुवारपणे स्पर्श करतात. कळी खुलते. हंसू लागते. सूर्य सुध्दां हंसू लागतो. सर्वत्र सुगंध पसरतो. कोठून तरी एक भ्रमर येतो. मकरंद सेवन करतो. गुंजारवाने सारी सृष्टि मंत्रमुग्ध होते. सायंकाळ होते. इकडे सूर्य मावळतो. तिकडे फूल कोमेजून वेलीवरून गळून पडते. फुलाला आणि सूर्याला येवढी गाढ मैत्री !

चकोरंगे चंद्रमन बेळगिन चिंते
अंबुजके भानुविन उदयद चिंते
भ्रमरंगे परिमळद बंडुंबुव चिंते
एनगे नम्न कूडल संगम देवर नेनेयुव चिंते !

या वचनांत महात्मा बसवेश्वरांनी नैसर्गीक मैत्रीच भक्तीच्या रूपाने वर्णिली आहे. चकोर पक्षी आणि चंद्राच्या शीतल चांदण्याची मैत्री. भ्रमर आणि फुलांतील मकरंद यांची मैत्रि .त्याचप्रमाणे भक्त आणि भगवंत यांची मैत्रि.

एत्तण मामर, एत्तण कोगिले
एत्तणिंदेत्त संबंध वय्या ?
गुहेश्वर लिंगक्केयू एनगेयू
एत्तणिंदेत्त संबंध वय्या ?

या वचनांत अल्लमप्रभुदेवांनी नैसर्गीक मैत्रि आणि भगवद्भक्ति यांचे सुंदर वर्णन केले आहे. कोठेतरी आम्रवृक्ष. कोठेतरी

कोकिळा. वसंत ऋतु येतांच आम्रवृक्ष बहरतो. सर्वत्र मादक मधुर सुगंध पसरतो. कोकिळेला ही कंठ फुटतो. ती आम्रवृक्षाकडे धांव घेते. आम्र मंजरीचा मादक मधुर सुगंध व कोकिळेचे गूंजन यांनीं वनांत जणूं स्वर्गच अवतरतो. आम्रवृक्ष आणि कोकिळेच्या मैत्रीचे हे सुंदर फळ !

डोंगरावर आंवळा जन्माला येतो. समुद्रात मीठ उत्पन्न होते. पण आंवळा आणि मीठ यांचा संयोग होतांच मधुर रूचि उत्पन्न होते. त्या दोहोंची मैत्रि किती सुंदर...किती सुरेख !

भक्त आणि भगवंत यामध्ये सुध्दा असाच अविनाभाव संबंध अमरप्रेम ..अमर मैत्रि. जीवाला भेटण्यासाठी (शिव) देव आणि देवाला भेटण्यासाठी भक्त आतुर असतात.

सूर्य फूलआणि कांटा यांत भेद मानीत नाही. तो त्या दोघांनाही समान मानून प्रकाश देऊन त्यांचे रक्षण करतो. आम्रवृक्ष कोकिळेला आणि कावळ्यालासमान मानून दोघांनाही आश्र य देतो. चंद्र चकोराला आणि किड्यांना सारखाच चांदणे देतो. फूल भ्रमराला-पशूंना वेगळे न मानतां सर्वानांच सुगंध देते. त्याचप्रमाणे भगवंतही सर्वांना समान लेखून अन्नपाणि पुरवितो. तो जगन्मित्र. जीव एकवेळ देवाला विसरूं शकेल पण देव जीवाला विसरत नाही. तो जीवाच्या ह्रदयांत नित्य स्पंदत असतो. मनुष्य कधी कधी सत्य देवाला विसरतो. असत्य आणि आसुरी मार्गाचा अवलंब करतो. पण तो दयासगर देव नित्य आपणांवर दया करतो.

गहन गंभीर असा एकसमुद्र. त्यांत एक मत्स्य कुटुंब. कुटुंबात अनेक मोठे मासे. कांही लहान मासे. त्यातील एक लहान मासा पोहत दूर गेला. परत आपल्या कुटुंबात यायला निघाला. कितीही शोधले तरी त्याचे कुटुंबीय भेटले नाहीत. आई-बाप, बंधु-बांधव सर्वांना गमावून बसला. ''मला कोणाचा आधार नाही. मी एकाकी झालो'' म्हणून तो लहान मासा दु:खी कष्टी होतो. तेवढ्यांत त्याला धीरगंभीर आवाज ऐकू

येतो. ''मी तुझ्या पाठीशी आहे. भिऊं नकोस ''

त्या लहान माशाला संतोष होतो ''कोण आहेस तूं?''

''मी सागर'' तो ध्वनि सांगतो.

''तूं कोठे आहेस?'' तो लहान मासा विचारतो

''तूं जेथे आहेस, तेथेच मीही आहे. तूं जन्माला आलास...वाढूं लागलास माझ्याच आश्रयांत ! मी तुझे सदा रक्षण करेन . चिंता करूं नकोस. सागर म्हणाला. ते ऐकून त्या लहान माशामध्ये जगण्यांत आनंद निर्माण झाला. उत्साहाने तो राहूं लागला. तो दयासागर देव सकल जीवराशींचे नित्य रक्षण करतो. तोच आम्हां सर्वांचा शाश्वत मित्र !!

एक भक्त होता. वयोवृध्द. त्याचे विशाल घर अतिथि सत्कारासाठी प्रसिध्द होते. एकदां मुसळधार पाऊस पडूं लागला. मध्य रात्रीची वेळ. कोणीतरी दरवाजा ठोठावीत होते. भक्ताने दार उघडले.

एक म्हातारा वाटसरू भिजून ओला चिंब झाला होता. थंडीने कुड्कुडत होता. भक्ताने त्याला आंत बेलावून जेवायला वाढले. मोठ्या आतुरतेने अतिथि अन्न खाऊ लागला.

''थांब ! आधी देवाचे नांव घे आणि मग जेवायला सुरू कर !'' भक्त म्हणाला

''जेवतांना देवाचे नांव घ्यायची काय आवायकता आहे?'' तो यात्रिक म्हणाला.

''हे भक्ताचे घर. या घरांत देवाचे नांव घेणाऱ्यालाच अन्न ..आश्रय ! तूं नास्तिक असावास असे दिसते. तुला या घरंत अन्न नाही. आश्रयही नाही. चालता हो येथून !'' असे म्हणून त्या भक्ताने यात्रिकाला घराबाहेर हाकूलन दिले.

त्याच रात्री भगवंताने वृध्दाच्या रूपांत त्या भक्ताला दर्शन दिले ''तूं कोण आहेस?'' भक्ताने विचारले

''मी भगवंत !'' वृध्दाच्या रूपांतील भगवंत म्हणाले

''देवा तू कां बरे थंडीने कुडकुडत आहेस ?'' भक्ताने विचारले

''काय करू? तूं रात्री मला घरातून हाकून लावल्यावर मी रात्रभर थंडीने कुडकुडत होतो'' देव म्हणाला

''तर मग रात्री वृध्दाच्या रूपाने तूंच आला होतास काय?'' भक्ताने विचारले . ''होय ! मीच. त्या वृध्दाला मी सत्तर वर्षे अन्न अणि आश्रय देऊन त्याचे रक्षण केले होते. तूं एक रात्रसुध्दा त्याला आश्रय दिला नाहीस. कां बरे?'' भगवंताने विचारले तेंव्हा भक्ताचे डोळे उघडले! देव दयासागर जगन्मित्र याचे त्याला ज्ञान झाले.

हे सत्य न जाणल्यामुळे आम्हाला माणसाला पाहून ही द्वेष.देवाला पाहून ही द्वेष. वैष्णवांना पाहताच शैवानां एक वेगळाच भाव. शैवांना पाहून वैष्णवांना एक भाव. खरे पाहता मंगलमय शिव व सर्वव्यापि विष्णु एकच ना? देव मंदिराचे एक सोडून द्या ! घरंत तरी मैत्रिभाव असावा ना! विवाह मंडपात वधु-वरंना ''तुम्ही यापुढे जन्मोजन्मी मित्र व्हा. प्रेमाने संसार करा !'' असा आशिर्वाद वडीलधारी मंडळी देतात. लग्न होऊन चार दिवसातच सति पति मध्ये विरस ! तर मग या जगावर या जनांगावर (समाजावर) आपण कसे प्रेम करायचे? संत मात्र भगवंताप्रमाणे जगन्मित्र होऊन सर्वांमध्ये मैत्रि भाव ठेवतात ! हेच निर्वैर होय !



# २४ क्षमा

संतांच्या ठिकाणी असणारा एक विशेष गुण म्हणजे क्षमा. ते कोणाशीही ईर्षा, द्वेष बाळगीत नाहीत. जीवनांत कुठलीही दुर्घटना घडली तरी त्यांचे मन विचलित होत नाही. दुष्कर्म करणाऱ्यांना ते शाप देत नाहीत. उलट सर्वांचे कल्याणच चिंततात. एखाद्या माणसाने चूक केली तर ते घोर पाप अथवा अक्षम्य अपराध असे न मानतां सहज नैसर्गिक घटना मानतात. हाच संतांचा क्षमा गुण होय.

येशू ख्रिस्ताच्या जीवनांत सुळावर चढण्याचा जो प्रसंग येतो तो क्षमागुणाविषयी जग प्रसिध्द आहे. ''तुझ्या शेजाऱ्यांवर स्वतः प्रमाणेच प्रेम कर !'' असा येशूचा अमर संदेश. पण सर्वांवर प्रेम करणे कांही लोकांना आवडले नाही असे वाटते. ते येशूचा द्वेष करूं लागले. एके दिवशी येशूला त्यांनी सुळावर चढवून टाकले. येशूच्या हाता पायांत खिळे ठोकण्या येवढे ते निर्दयी झाले.

प्रेमाचा पुतळा येशू. त्याचा पवित्र देह सुळावर लटकलेला होता. देहांतून थेंबथेंब रक्त गळत होते. यातनांची पराकाष्ठा झाली. येशूने देवाची प्रार्थना केली. जगाच्या धार्मिक इतिहासांत क्षमा गुणाचे ते श्रेष्ठ उदाहरण !

''हें देवा, तूं त्यांना क्षमा कर ! आपण काय करतो आहोत याचे ज्ञान त्यांना नाही''

प्राण संकटात सुध्दा संत क्षमाशील असतात.

भारत देशाच्या इतिहातासात अशी अनेक उदाहरणे ! स्वामी

दयानंद सरस्वति धार्मिक शुध्दीचे प्रवर्तक. धर्म शास्त्राचे त्यांनी सखोल अध्ययन केलेले होते. शास्त्रार्थामध्ये त्यांचा हात धरणारा कोणीच नव्हता. दयानंद सरस्वतींची वाढती लोकप्रियता कांही जणांना सहन झाली नाही. कसेतरी करून दयानंद सरस्वतींना संपवून टाकण्याचा त्यांनी निर्धार केला. दयानंद सरस्वतींची सेवा अनेक वर्षे एक निष्ठेने केलेल्या एक शिष्याला त्यानी गाठले. त्याला पैशाचे प्रलोभन दाखविले. तो शिष्य त्या आमिषाला बळी पडला. परम गुरूला त्याने विष दिले. दयानंद सरस्वति मूर्च्छित झाले. शिष्य घाबरले. त्यांनी आपणांस सुचले तसे उपचार केले, दयानंद सरस्वति शुध्दीवर आले. त्यानां विषपान करविलेल्या शिष्याला बांधून घातले होते. ते पाहून दयानंद सरस्वतीनी विचारले, ''याला कां बरे बांधून घातले?''

शिष्य म्हणाले, ''गुरूदेव ! या चांडाळाने गुरूहत्येचे पाप केले आहे. त्याने तुम्हाला विष दिले. त्याला शिक्षा घडायला नको काय?''

दयानंद सरस्वतींनी जे उत्तर दिले ते त्यांच्या क्षमा गुणांचे द्योतक ! ''मी या जगांत आलो लोकांना बंधमुक्त करायला, त्यांना बंधनात टाकायला नव्हे. सोडून द्या त्याला.''

शांति-दूत बुध्दाच्या जीवनांत अशीच एक घटना घडली. बुध्दाचे हजारो शिष्य होते. त्यांची किर्ती जगभर पसरली. अनेक राजे महाराजे बुध्दाला शरण आले. कृपण लोक उदार झाले. क्रोधी जन शांत-मूर्ति बनले. जन धर्मपथ, निर्वाण क्षेत्राकडे धावत आले. आशा-आमिष यांच्या धुळीपासून मुक्त-अतीत अशी बुध्दाची अमृतवाणी ऐकून लोकांमध्ये अगाध परिवर्तन झाले. देशांत शांति समाधानाच्या थंड वाऱ्याची झुळुक वाहूं लागली.

बुध्दाची धवल किर्ती देवदत्ताला सहन झाली नाही. त्याने बुध्दाचा वध करण्याची योजना केली. एके दिवशी बुध्द आपल्या कुटिरांतून बाहेर पडत,होता. दोन चार पावले चालून जातो; तोंच एक

मोठा दगड वरून गडगडत खाली आला. बुध्दाच्या समोर पडला. बुध्द थोडक्यांत वांचला. एक घोर अनर्थ टळला.

बुध्दाने वर पाहिले. तेथे देवदत्त खाली मान घालून उभा होता. बुध्दाने मंद स्मित केले. तो पुढे निघाला. कुटिरातून बाहेर येतांना बुध्दाच्या मुखावर जी प्रसन्नता होती, त्यांत तसुभरही फरक पडला नव्हता. प्रसन्नता ढळली नव्हती. राग द्वेषाची सीमा उल्लंघन करणाऱ्या क्षमाशील संतांच्या जीवनाची ही रीत !

जगांतील सर्व संतांच्या जीवनांत या क्षमा मणीचा दिव्य प्रकाश पसरलेला आपणांस दिसतो. महात्मा बसवेश्वर म्हणतात,

"तप्पन्नरिसि शिक्षिसुवन्न बर नरकुलक्के होरगु ।"

"लोकांनी जाणतां अजाणतां केलेली चूक शोधून त्यानां शिक्षा करणे मनुष्यत्व नव्हे !"

हा त्यांचा क्षमा गुण . मातृहृदय. त्यांनी चोरामध्ये सुध्दा संगमनाथाला पाहिले.

क्षमाशील असावे याचा अर्थ जगांत ज्या चुका घडतात. त्या सर्वांना संमति द्यावी. त्यांना प्रोत्साहन द्यावे. असा नव्हे. आपल्या समाजांत घडणाऱ्या चुका आपण अवश्य सुधाराव्यात. लोकांचे मन शुध्द करावे. पण आपल्या हृदयात कोणाविषयीसुध्दा कटु भावना नसावी.

शाळा चुकवून उनाडक्या करणाऱ्या आपल्या मुलाचा कान पिळून आई त्याला शिक्षा करते. कधी कधी मुलाला अंधाऱ्या खोलीत डांबून ठेवते. उपाशी ठेवते. याचा अर्थ माता मुलाचा द्वेष करते असा नव्हे. वर वर पाहतां मुलाला शिक्षा देते असे वाटते. पण ते मुलाच्या भावी जीवनाचे रक्षण होय !

एक घर. दारूडा बाप. लहान मूल. बापाला पाणी आणून देतानां काचेचा पेला फुटला. मौल्यवान पेला नष्ट झाला. बाप मुलावर

रागावला. बालक म्हणाला. बाबा माझ्या हातून न कळत चूक झाली. क्षमा करा. पण माझा एक प्रश्न आहे'' बापाचा राग थोडासा शांत झालेला होता. तो म्हणाला, ''काय आहे तुझा प्रश्न?''

मुलगा म्हणाला, ''मी जो कांचेचा पेला फोडला तसलाच पुन: पैसे देऊन बाजारांतून विकत आणतां येईल. पण देवाने दिलेले देहरूपी हे सुंदर पात्र आपण दारू पिऊन नष्ट करीत आहांत. एकदां हे शरीर नाश पावले तर दुसरे शरीर आणतां येईल काय?''

मुलाचा प्रश्न ऐकून बापाला राग आला. दुसऱ्या क्षणीच आपण करीत असलेले मद्यपान खरोखर अपायकारी आहे, याची त्याला जाणीव झाली.

चुका परणाऱ्यांना शिक्षा करण्यापूर्वी आपण स्वत:कडे पहांवे. आत्म परिक्षण करून आपण किती परिशुध्द आहोत याचा विचार करावा. तेंव्हा आपल्या ठिकाणी शिक्षा करण्याची दंड करण्याची प्रवृत्ति कमी होते. परम पवित्र असा रक्षण करणारा क्षमा गुण आपल्या ठिकाणी येतो. जीवनांतील अनंत दु:ख अनायासाने नाहीसा करणारा हा क्षमा गुण दैवी गुण होय! आनंद योगाचे हे सुगम सूत्र होय!



# २५ संयम

धर्मपथांत मार्गक्रमण केले असतां सत्यदर्शन घडते. सत्यदर्शनाने आनंदानुभव होतो. श्रध्दा, सदाचार, समरति हे तीन धर्मांग! श्रध्देमुळे धर्माचा आरंभ, सदाचाराने धर्माचा विकास, समरति मुळे धर्मांचे फलामृत! समरति मध्ये संयम, संस्मरण, सामरस्य असे तीन उपांग आहेत. आतांपर्यंत श्रध्दा, सदाचार यांविषयी चर्चा केली. आतां समरतिमध्ये संयम या विषयाचे चिंतन करूं!

हे सर्व जग चल. वारा वाहतो, पाणी वाहते, भूमि फिरते. पण आपण ज्या ओट्यावर अथवा खुर्चीवर बसलो आहोत तो ओटा अथवा खुर्ची गतिमान नाही, असे आपण समजतो. आपण स्थिर आहोत असा आपल्याला भास होतो. ज्या भूमीच्या आधारावर आपण बसलो आहोत. ती भूमीच गतिमान असातांना आपली खुर्ची अथवा ओटा स्थिर आहे असे वाटणे हा भ्रमच ना? वरवर पाहतां ते स्थिर असल्याप्रमाणे भासतात. तरी ते सुध्दां निरंतर गतिमान असतात. त्यांच्या आंत सतत चलन वलन असते. त्या चलन वलनाचा वेग कमी अधिक असूं शकेल. चलन मात्र त्यांच्यामध्ये आहेच.

सर्व वस्तु परमाणूंचा पुंज होय. परमाणू डोळ्यांना दिसत नाहीत. आपल्या दृष्टीच्या एक लाख पटी हून अधिक सूक्ष्म ते. अशा अणूंमध्ये असणाऱ्या प्रोटान्सचा वेग एका सेकंदाला तीन लक्ष किलोमीटर. स्थिर भासणारा सूर्यसुध्दां स्वत:भोवती फिरतो. विश्वाच्या चलनाचे हे विराट रूप! अशा या जगाच्या आधारावर असलेले आपले

तनु-मन, धन-कनक वगैरे चलन पावल्याशिवाय राहतील काय?

या देहाचे चलन-वलन दोन प्रकारचे. एक देशांत चलन. दुसरे कालांत चलन. घरून शेताला जाणे, एका गांवाहूनदुसऱ्या गांवाला जाणे, हे देशांत चलन. आपण एका स्थळापासून दुसऱ्या स्थळाला जातांना समयसुध्दा आपोआप सरकतो. अशाप्रकारे आपण देश चलन करीत असतांनाच काल चलन ही करतो. त्यामुळे आपल्या देहाला बाल्य, यौवन, वार्धक्य वगैरे व्यापतात. ते कोणालाही थांबविता येत नाही. कितीही समर्थ माणूस असला तरी त्याचा देह, देश, काल यांमध्ये गतिमान होऊन एक दिवस नाश पावतो.

त्याचप्रमाणे आपले मनसुध्दा देशांतर कालांतर करते. भूत वर्तमान भविष्य काळांत चलनमान होते. क्षणार्धात हजारो किलोमीटर दूर संचार करते. कल्पना लोकांत विहार करते. माणूस कितीही सामर्थ्यवान असला तरी त्याला ओढून नेते.

एक म्हातारा घरांतून बाहेर आला होता. त्याला दंवडी पिटविलेली ऐकूं आली. ''या देशाची महाराणी मरण पावली. या देशांतील सर्व प्रजेने शोक आचरावा''

हा डांगोरा पिटलेला ऐकतांच त्या म्हाताऱ्याच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. हे पाहून संताने त्याला विचारले, ''तूं या देशाच्या महाराणीला पाहिले होतेस काय?''

''नाही'' तो म्हातारा म्हणाला

''त्या राणीने तुझ्यावर उपकार केले आहेत काय?'' संताने विचारले.

''नाही'' म्हातारा म्हणाला

''तर मग महाराणी मरण पावली हे ऐकून तूं कां बरे दुःख करतोस?''

तो म्हातारा म्हणाला ''पन्नास वर्षापूर्वी मरण पावलेल्या माझ्या पहिल्या पत्नीचे नांव महाराणी!''

म्हाताऱ्याचे मन महाराणी हा शब्द ऐकतांच पन्नास वर्षे मागे

गेले होते. हे मनाचे भूतकाळातील चलन त्याचप्रमाणे मन भविष्यकाळांत सुध्दा चलन पावते. सुवर्ण-स्वप्ने रचते. भूतकाळांत मनाचे चलन जेवढे रोचक, तितकेच भविष्यकाळांतील चलन सुध्दा तितकेच किंबहुना त्याहून अधिक रोचक !

एक माता आपल्या बालकाला पाळण्यांत झोपवून पाळणा झुलवीत असते. पाळण्याला झोका देतां देतां मातेचा डोळा लागतो. माता दिवास्वप्न पाहूं लागते. स्वप्नांतच बाळ वाढूं लागते. मुलगा मोठा होतो. मोठा विद्यावंत होतो. श्रीमंत होतो. त्याची किर्ती देश विदेशांत पसरते. दूर देशाचा एक राजा आपली सुंदर राजकन्या या युवकाला देऊं करतो...

मूल पाळण्यांतच असते. अजून नीटपणे डोळे उघडलेले नसतात. पण राजकुमारी सून होऊन घरी यायची असते. आईचे मन भविष्यकाळांत फार दूरवर गेलेले असते. हे मनाचे भविष्यकालांतील सुमधुर चलन !

अशा प्रकारे आपले मन वर्तमान काळांत सुध्दा चालू लागते. भूत काळांत आणि भविष्य काळांत आपल्या डोळ्यांना न दिसणाऱ्या हाती न गवसणाऱ्या विषयांतच आपले मन सदैव रमते. वर्तमान काळांत शब्दादि विषय प्रत्यक्ष असतात. अशावेळी त्यांच्या आकर्षणाविषयी किती सांगावे? शब्द, स्पर्श, रूप रस गंधादि विषयांच्या आकर्षणांत कोणाचेही मन चळते. त्या विषयांना बळी पडते.

फार पूर्वीची गोष्ट. एके दिवशी अरण्यांत एक तरूण, सुंदर घोडा आपला जीव वांचविण्यासाठी धावत होता. त्या घोड्यापाठीमागून एक चित्ता येत होता. हे पाहून माणसाने धनुष्याला बाण चढविला. व नेम धरून त्या चित्यावर सोडला. चित्ता घायाळ झाला. तत्क्षणीच मरून पडला. घोड्याला फारच आनंद झाला. माणसाचे उपकार स्मरण करण्यासाठी घोडा माणसाजवळ आला. माणसाने मोठ्या प्रेमाने त्याच्या

पाठीवरून हात फिरविला. घोड्याला फारच सुख वाटले. माणसाला कृतज्ञता व्यक्त करू न घोडा परत गेला.

दुसऱ्या दिवशी घोड्याला माणसाच्या प्रेमळ स्पर्शाचे स्मरण झाले. तो माणसाच्या भेटीला आला. कांही दिवस गेले. घोडा माणसाच्या स्पर्श सुखांत देहभान विसरून गेला. ही संधि साधून माणूस घोड्यावर स्वार झाला. किती काळ लोटला. पण माणूस अजूनही घोड्याच्या पाठीवरून उतरलेला नाही. घोड्याला मुक्ति लाभली नाही. स्पर्श सुखाला बळी पडलेल्या त्या एका घोड्यामुळे घोड्यांचे संपूर्ण कुळ माणसाच्या बंधनांत सांपडले.

त्याचप्रमाणे माणसाचे मन शब्दादि विषयांच्या आकर्षणांत गुंतते. कधीही न तुटणाऱ्या संसाराच्या बंधनांत अडकते. हे बंधन या बंधनात न पडणे. हाच संयम. संयमाने राहणे सोपे नव्हे. विषयाचें आकर्षण फारच बलिष्ठ.

गृहिणी स्वयपाक घरांत काम करीत असते. मुलगा अभ्यास करीत असतो. तेवढ्यांत बाहेर मिरवणूक येते.वाद्यवृदांचे मधुर सूर कानांवर पडतांच मुलगा अभ्यास सोडून बाहेर येतो. गृहिणीसुध्दा हातांतील काम अर्धवट टाकून बाहेर येते. संगीताचा शब्द मुग्ध बालकाला आणि सुजाण गृहिणीला आकर्षित करून घेतो. शब्दादि विषयांचे आकर्षण अद्‌भुत असते. अल्लमप्रभुंनी आपल्या वचनामध्ये या पंच विषयांना मढे म्हटले. जगातील सर्वजण या मढ्यासाठी रडणारे त्यांचे सगे सोयरे. राजे महाराजे, विद्यावंत अविद्यावंत सर्वजण या-शब्दादि पंच विषयांच्या पाठीमागे धावणारेच.

एका राजाने भारत देशावर नव्वद वर्षे राज्य केले. आपल्या सुखासाठी त्याने आपल्या पित्याला सुध्दा करावासात ठेवले. मुलांना जवळ केले नाही. त्यांच्या विकासाचा विचार केला नाही. युध्द-कत्तल, पिळवणूक लुटालूट करून त्याने अपार संपदा जमविली. त्याचा अंतकाळ

जवळ आला. याच्या शेजारी धर्मगुरू पवित्र धर्मग्रंथाचे पठण करीत होते. अशावेळी राजाला वाटले. की आपण आतांपर्यंत केलेले सर्व प्रयत्न व्यर्थ. पण काळ गेला होता. आतां पश्चत्ताप करून काय लाभ?

माणसाने आधीपासूनच जागृत होऊन शब्दादि विषयांच्या आकर्षणापासून मागे सरावे. हाच संयम होयं. आपल्या जीवनाला आवश्यक विषय-वस्तु असणे आवश्यक . पण आपण योग्य असा आहार-विहार सेवन करावे. हेच आनंद योगाचे संयम सूत्र होय !



# २६ प्रसाद-जीवन

जीवन आनंदपूर्ण होण्यासाठी सत्याची अनुभूति होणे आवश्यक . संपूर्ण जीवनांत धर्माचे अधिष्ठान असावे. मनांत श्रध्दा, तनुमध्ये सदाचार, आत्म्यामध्ये समरति असावी. समरतीचे प्रथम अंग संयम. माणसाचे मन बाह्य प्रापंचिक विषयाकडे वाहून तेथे गुंतते. विषय बंधने तोडून त्यांत न गुंतणे हांच संयम ! त्यासाठी जीवनाचे प्रसादीकरण व्हावे.

संतांचे शरणांचे जीवन संयमित. प्रासादिक. अक्कमहादेवीला दैहिक सौंदर्य, बौध्दिक सामर्थ्य, भौतिक संपत्ति कशाचीही कमतरता नव्हती. राजाने तिच्या सौंदर्यावर मोहित होऊन सकल संपदा तिच्या चरणांवर वाहिली होती. पण अक्कमहादेवीने त्या संपत्तीकडे पाहिलेसुध्दा नाही. परम विरागिणी होऊन आपल्या आराध्य देवामध्ये ती समरस झाली. हे शिव-जीव सामरस्य समरति !

आपले जीवन कसे प्रासादिक झाले? हे अक्कमहादेवी आपल्या वचनांत सांगते.

काय प्रसादवेन्न, जीव प्रसाद वेन्न
प्राण प्रसाद वेन्न, भाव प्रसाद वेन्न
सुयिधान प्रसाद वेन्न, समय प्रसाद वेन्न
चेन्न मल्लिकार्जुनय्या, निम्म प्रसादव हासि होदेदुकोंडिप्पेनु

(माझी काया प्रसाद, माझा जीव प्रसाद. माझे प्राण प्रसाद, माझा भाव प्रसाद; माझे ज्ञान प्रसाद, संयम प्रसाद चेन्नमल्लिकार्जुन देवा मी तुमचा

प्रसादच आंथरून पांघरून घेतला.)

आपले मन ज्या ज्या विषयांकडे वळते ते सर्व विषय भगवत्प्रसाद. परम सत्याचे अभिव्यक्त रूप असे समजावे. तेव्हा आपले मन त्या विषयांत गुंतत नाही. संयम व्यक्त होतो. ते प्रसाद जीवन होय. अक्कमहादेवीच्या जीवनांत दिव्य प्रसाद उत्पन्न झाला. तिचा देह, मन, बुध्दि, भाव, जीव सर्व काही प्रसादमय झाले.शरण-संत देव प्रसादच्च आंथरून पांघरून जीवन घालवूं लागले. तसे झाल्याने साधकाचे मन विषयाकडे कसे वळेल? अशी प्रसादिक दृष्टि लाभल्याने अक्कमहादेवि जीवन्मुक्त झाली. वैषयिक दृष्टि असल्याने कौशिक राजा भव-बध्द !

प्रसादामध्ये आशा-आमिष नसते. प्रसन्नता असते. मला तुला हा भेदभाव नसतो. सर्वजण एक ही समदृष्टि असते. लग्नांत पक्वनांचे जेवण असते. लोक त्यांतसुध्दा दोष शोधतात. रूचि पाहतात. देवळांत खोबऱ्याचा तुकडा, खडीसाखर अथवा चुरमुरे प्रसाद म्हणून देतात. लोक तो प्रसाद भक्तिभावाने स्वीकार करतात. त्यांतच संतोष मानतात. लग्न घरातील पक्वान्नांचे ते जेवण असते. देवळांतील अन्न प्रसाद असतो. ही प्रासादिक दृष्टि ज्यांना आहे, असे संत-शरण प्रापंचिक विषयांच्या आकर्षणांना बळी पडत नाहीत. त्यांचे जीवन संयमित; प्रसाद जीवन ! अलिकडे भारत देशाच्या आध्यात्मिक इतिहासांत एक अपूर्व अशी प्रासादिक घटना घडली. स्वामी रामकृष्ण परमहंस युगावतारी. सदा ब्रह्मभावांत तल्लीन. त्यांच्या पत्नी शारदामणी तितक्याच सात्विक शांत संयमी. रामकृष्ण परमहंसाचे नुकतेच लग्न झाले होते. रामकृष्णांनी शारदामणीला विचारले,'' मला तुम्ही जशा दिसतां तसे मी तुम्हाला पाहूं? अथवा या सर्व लोकांना जशा दिसतां तसे पहावे?''

शारदामणी म्हणाल्या ''मी तुम्हालां जशी दिसते तसे तुम्ही मला पाहा !''

रामकृष्णांनी शारदामणींना कालीमाता.मानून त्यांची पूजा

आरंभली. त्या दिवसापासून शरदामणी शारदामाता झाल्या लग्नाच्या पहिल्या दिवशीच रामकृष्णांनी शारदामध्ये कालिका देवीचे दर्शन घेतले. ही प्रासादिक दृष्टी.

∵ प्रासादिक दृष्टीने आपण जगाकडे पाहिले असतां ते आपणांस कधीही बंधनकारी वाटत नाही. मन संयमित होऊन सत्यामध्ये समरस होते. जीवनांत परम शांति, समाधान येते. हे प्रायोगिक अध्यात्म. हाच आनंद योग ! अध्यात्म म्हणजे आपणांला न गवसणारे मेघ नव्हे. या भूमीवर आपल्या पायांना चिकटणारी माती हे सत्य आपणांस समजले नाही तर अध्यात्म आपणांस गगन कुसुम ! हे सत्य उमगले तर करतलावरील आंवळ्याप्रमाणे स्पष्ट. हाती गवसणारे.

बंगाल प्रांतात चैतन्य महाप्रभु भक्ति क्षेत्रातील एक अमर नांव मोठे गाढे विद्वान.प्रभावशली संत एकदा ते हरि कीर्तनासाठी एका गांवी गेले, सारा गांव भक्तिरसांत मग्न झाला. हजारो भक्त. हरिकथा ऐकून तृप्त झाले.

त्याच गावांत एक वृध्दा होती. तिचा एक छोटासा नातू होता. त्या नातवावर आजीचे अपार प्रेम नातवाच्या बाललीलेंत...त्याला न्हाऊ माखू घालण्यांत...त्याला जेवू-खाऊ घालण्यांत आजी देहभान विसरत असे. सारा गांव चैतन्य महाप्रभूंच्या सत्संगात मग्न झाला होता. ही वृध्दा मात्र आपल्या नातवामध्येच मग्न झाली होती.

लोकांच्या आग्रहास्तव ही वृध्दा कुतुहलाने सत्संगाला गेली. चैतन्य महाप्रभूंनी सुमधुर संगीतासह भक्ति रस भरीत कीर्तन केले. जणू कांही गोपालकृष्णच त्यांच्या कीर्तनांत अवतरून नांचू लागला. श्रोत्यांच्या डोळ्यातून आनंद बाष्प वाहू लागले. ती वृध्दा सुध्दा देहभान विसरून हरिकथेत रंगली.

किर्तन संपल्यावर सगळे लोक निघून गेले. ती वृध्दा तेथेच बसून राहीली. तिला पाहून चैतन्य महाप्रभु तिच्याकडे आले. वृध्देच्या

डोळ्यांतून आनंदाश्रु वाहात होते.

चैतन्य महाप्रभूंनी विचारले ''आजी तूं घरी जात नाहीस काय?'' ''नाही मी आश्रमांतच हरि-स्मरण-सेवा करून माझा उध्दार करून घेईन'' वृध्दा म्हणाली.

चैतन्य महाप्रभूंनी तिच्या राहण्याची व्यवस्था लावून दिली: त्या दिवशी ती वृध्दा भक्तवृदांसमवेत हरिभजन, गुरूसेवा यांत मग्न झाली. संध्याकाळ होत आली तसे तिला आपल्या नातवाच्या पायांतील नूपुरांचा ध्वनि ऐकू येऊ लागला. कसे तरी सावरून ती आश्रमांत झोपी गेली. मध्यरात्री वृध्दा जागी झाली. आंथरूणांत तिने चाचपडून पाहिले. नातू नव्हता. वृध्दा घाबरली. आपण घरी नसून आश्रमांत आहोत हे समजायल वृध्देला बराच वेळ लागला.त्यानंतर तिला झोप लागली नाही. सकाळी उठतांच घरी जायचे असे तिने ठरविले.

इतके सगळेजण आश्रमांत असताना आपण घरी जाण्याचे कसे सांगायचे ? असा वृध्देला संकोच वाटला, प्रभूंनीच आजीचे मुख पाहून विचारले ''आजी रात्री झोप लागली नाही काय ? नातवाची आठवण झाली काय?''.

''होय प्रभो, काय करू? मी माझ्या नातवाला विसरू शकत नाही.'' आजी म्हणाली. नातवाच्या मोहाने मला बांधून घातले आहे'' आजीने आपली व्यथा सांगितली. प्रमु हंसत हंसत म्हणाले ''हे कांही बंधन नव्हे तूं घरी जा. तुझ्या नातवालाच बालकृष्ण असे समज. तूं मुक्त होशील.'' हे ऐकतांच वृध्देला प्रासादिक दृष्टि लाभली तिचे जीवन प्रसन्न झाले.

आपणांस अत्यंत प्रिय व्यक्ति अथवा वस्तु भगवत्प्रसाद मानून आपण व्यवहार करावा. तेव्हा आपल्या मनांत संयम उत्पन्न होतो. त्या वस्तु अथवा व्यक्तीच्या मोहांतून पार होतो. प्रपंचच पारमर्थ होतो. या प्रासादिक दृष्टिने मनुष्य सद्योन्मुक्त होतो. हेच प्रसाद जीवन होय. हाच आनंद योग !!

# २७ संस्मरण

सत्यदर्शनाच्या योगे आनंद योगाला कारण अशा धर्माचे अंतीम 'अंग म्हणजे समरति. त्यामध्ये संयम संस्मरण, सामरस्य असे तीन अंग या आधी आपण संयम या विषयाचे चिंतन केले. आतां संस्मरण.

हा प्रपंच (जग) वैभवपूर्ण, वैविध्यमय. येथे आपण जोपर्यंत जिवंत आहोत. तोपर्यंत शब्दादि विषंयांचा संपर्क अनिवार्य. आपण या जगांत कशालाही स्पर्श केले, अवघ्राण केले, ऐकले, पाहिले तरी आपल्या मनांत परम सत्यदेवाचे स्मरण दृढ व्हावे. ते सत्य संस्मरण ! त्यामुळे आपणांस हा प्रपंच बंधनकारी होत नाही. जीवनांत अतुल शांति समाधान लाभते. हा आनंदयोग !

मूल सत्य अचल, अनंत, अखंड, अद्वितीय ! हा प्रपंच सचल, सांत खंडित कलील. म्हणूनच आपला देह, मन, बुध्दि, भाव सर्व कांही सचल (चंचल) सांत. अशा अस्थिर अशाश्वत प्रपंचात असतांना आपल्या अंतरंगात अचल सत्याचे स्मरण नित्य चलावे. हेच संस्मरण होय !

देह कोणाचाही असला तरी त्यांत बदल होणे; हा त्याचा धर्म. बाल्य, तारूण्य, वृध्दाप्य या अवस्था देहाला प्राप्त होतात. या सर्व अवस्था मी पाहतो. अनुभवतो. पाहणारा मी या देहाहून भिन्न असलाच पाहिजे ! तोच आत्मा ! तोच मी ! नाशवंत देहामध्ये असतानांच ''अविनाशी आत्माच मी'' हे ओळखावे. हे आत्म संस्मरण. त्यामुळे मला सुख-दु:खाची बाधा होत नाही. मी सदा संतुष्ट असतो.

देहाप्रमाणे आपले भावसुध्दा बदलतो. प्रीती-प्रेम,स्नेह वात्सल्य या मधुर भावनेवर आपले जीवन उभे आहे. पण या भावना किती शाश्वत? श्रीराम अवतारी पुरूष. त्याचे सीतेवरील प्रेम किती अगाध ! तिला रावणाच्या तावडींतून सोडवून आणयला त्याने किती प्रयत्न केले ! रावणासह अनेक राक्षसांचा वध करून त्याने सीतेला परत आणले. ''आतां यापुढे मी सीतादेवीला सोडून राहणार नाही'' असे म्हणाला. पुढे कांही दिवसातच लोकापवादाला भिऊन त्याने सीतादेवीचा त्याग केला. प्रभु रामचंद्राची ही कथा; तर मग इतर जनांची काय अवस्था ?

लग्न मंडपात बोहल्यावर बसलेले असतां वधु-वर ''सात जन्मामध्ये आपण असेच अन्योन्य होऊन राहूं'' असे म्हणतात. पण सात दिवसातच ते विसरतात. त्यांचा भाव बदलतो. पण बदलणाऱ्या या भावनांना पाहणारा मी, या भावनेतून वेगळा. अचल आत्माच मी . हे ओळखणे, हेच संस्मरण होय !

आपला भाव जसा बदलत जाईल तशी बुध्दि आणि विचार बदलतात. द्वैत-अद्वैत, सिध्दांत-वेदान्त, गृहस्थ-संन्यास असे अनेक विचार ! मला एकदां एक विचार पटतो, आणखी एकदां दुसरा विचार खरा वाटतो.अशाप्रकारे आपले सर्व विचार अनुदिन, प्रतिक्षण बदलत असतात. पण खरे पाहतां मी द्वैती नव्हे की अद्वैती नव्हे. मी मीच ! तोच आत्मा; हे जाणणे म्हणजेच आत्म संस्मरण होय !

खरे पाहतां शून्य अमूल्य. त्याची किंमत करतां येत नाही. इतर अंकांशी मिळून त्याची किंमत दशमादि स्थान मिळवते. एकं, दहं-शतं -सहस्त्र अशी होते. शून्याप्रमाणे आत्मासुध्दा अमूल्य. अचलं, अनंत. नित्य निरंजन ! पण देह मन बुध्द्यादिशी आत्मा एक होऊन जीव सचल सांत, अनित्य असे वाटून भ्रमांत पडतो. संत शरण मात्र सदा सर्वत्र अचल आत्माच पाहतात. हे सत्य संस्मरण होय.

महात्मा बसवेश्वरांच्या घरी चोरी करण्याच्या उद्देशाने एक चोर आला. सेवकांच्या हाती सांपडला. ''मी चोर चोरी करण्याच्या उद्देशाने आलो होतो. मी अपराधी मला क्षमा करा असे गयावया करू लागला'' बसवेश्वर परमानुभवी . ते म्हणाले ''तूं चोर नव्हेस. माझे इष्ट दैवत साक्षात कूडलसंगम देवच तूं !'' असे म्हणून बसवेश्वरांनी त्या चोराचे सांत्वन करून पाठविले. चोरामध्येसुध्दां बसवेश्वरांना कूडलसंगमदेवच दिसला. हे सत्य संस्मरण.

एक माणसाने एक पोपट पाळलेला होता. त्या पोपटाला सोन्याच्या पिंजऱ्यात ठेवले होते. तो माणूस त्या पोपटाला राम म्हणून हांक मारीत असे . त्या माणसाची पत्नी त्या पोपटाला लक्ष्मण म्हणून हांक मारीत असे. मुले त्याला भरत म्हणत असत. त्याला गोड फळे देऊन त्याचे पालन-पोषण करीत असत.

एके दिवशी त्या पोपटाच्या पिंजऱ्याचे दार चुकून उघडे राहिले पोपट अंशा संधीची वाट पहात होता. तो पिंजऱ्यातून बाहेर आला. उडत जाऊन झाडावर बसला. घरचे लोक घाबरले.सर्वजण बाहेर येऊन त्या पोपटाला प्रेमाने बोलावू लागले. ''राम...लक्ष्मण...भरत ..ये..ये!''

''मी राम नव्हे...लक्ष्मण नव्हे...भरत नव्हे. मी पोपट !'' असे म्हणून तो पोपट उडून गेला.

देव हा आत्माराम. हा प्रपंच म्हणजेच सोन्याचा पिंजरा. शब्दादि विषय, हीच फळे. आई-वडील वगैरे घरचे यजमान ! बंधु-बांधव जेव्हां विस्मरणाने गाफील राहतात. ती वेळ साधून सत्य साधकाने ज्ञानाचा दरवाजा उघडावा. अनंत आकाशांत विहार करावा. स्व-स्वरूप जाणून आत्मानंदात असावे. हे सत्य संस्मरण होय. नाटकांत नट विभिन्न पात्र धारण करतो. भीम -दुर्योधन, राम रावण सीता द्रौपदी सर्व पात्रे जिवंतपणे उभी करतो. आपल्या अभिनय कौशल्याने प्रेक्षकांची मने जिंकतो. दुर्योधन अथवा रावणाचे पात्र करतांना ते युध्दांत हरतात.

म्हणून तो दु:खी होत नाही. भीमाचे अथवा रामाचे पात्र करतानां युध्दांत जिंकल्याचा आनंद त्याला होत नाही. कारण त्याला माहित असते आपण ते पात्र नव्हे 'पात्रधारी.'

हे जीवन म्हणजे लीलाविलास. एक नाटक. तेथे आपण नेमून घेतलेले आपापले पात्र श्रध्देने करावे. त्याला अनुसरून अभिनय करावा. सर्वांना संतोष द्यावा. पण आपण हे जाणून घ्यावे. ''मी सति नव्हे ! पति नव्हे ! मी परम सत्य ! परम आत्मा !'' असे हे स्मरण दृढ असावे. हेच संस्मरण होय !!



# २८ सामरस्य

सत्याची आठवण मनांत भरून राहिली तर ते संस्मरण. सत्यामध्येच आपण एक झालो तर ते सामरस्य ! संस्मरणात मी सत्याला आठवतो. असा भाव असो. सामरस्यांत मी हा भाव नाहीसा होतो. तेव्हा सत्यच आपण ! आपणच सत्य !'' हे सामरस्य. हे एक फूल. मी हे फूल पाहतो त्या फुलाचे चित्र मनांत उमटते. त्या फुलाला पाहतां पाहतां मनांत फूल...फुलांत मन विरून जावे. तेंव्हा फूल सोडून मला दुसरे कांहीच दिसत नाही. हे सामरस्य !

सत्याचे संस्मरण दृढ होत जाईल तसे आपले मन परम सत्यामध्येच रममाण होते. हेच सामरस्य ! त्याचे वर्णन करतां येत नाही. त्याचा अनुभव घेऊन आनंद मिळवावा,

माता बाळाला पाळण्यांत बसवून अंगाई गीते गाते. पाळण्याला झोका देते. ते मधुर वात्सल्यभरित अंगाई गीत ऐकत ऐकत बाळ पाळण्यांत झोपते. इकडे गात-गात मातासुध्दा झोपी जाते. आतां माता नाही की बाळ नाही. अंगाई गीत ही नाही. केवळ निद्रा.

तसेच गुरूशिष्यांनी आत्मबोध सांगत ऐकत परमानंद सागरांत एक होणे हेच सामरस्य. तेथे गुरु नाही; शिष्य नाही. वक्ता नाही श्रोता नाही; केवळ आत्मानंद ! हेच सामरस्य होय !!

अशा रीतीने सत्य सामरस्याने परमानंद मिळविणे हेच आपले ध्येय ! एका माणसाला सगळी श्री संपदा, स्थान-मान, असते. पण त्याला शांतपणे झोपच लागत नाही. तर मग त्याच्या श्री-संपत्तीला

काय अर्थ? म्हणूनच सकल वेद आगम, पुराण शास्त्र आत्मानंदाचाच बोध करतात. चतुर्विध पुरूषार्थां मध्ये धर्मालाच प्रथम स्थान देतात.

आत्मा परमात्मा यांच्या समरतिने उत्पन्न होतो दिव्यानंद ! प्रपंचाच्या सकल विषय भोगापासून मिळणारे सुख त्या दिव्यानंदाची बरोबरी करूं शकत नाही. आत्मानंदाची प्राप्ती होण्यासाठी प्रथम आपल्या ठिकाणी अन्यासक्तीचे निरसन व्हावे. श्रध्दा सदाचार-समरति'' यांनी युक्त अशा धर्म मार्गाचे नित्य अनुसरण करावे. तेव्हा परम सत्य दर्शन घडते. परमानंद लाभतो. हाच आनंदयोग ! आपले जीवन पवित्र झाल्यावर आपणांस हा प्रपंच बंधनकारी होत नाही. तेव्हा माणूस जीवनांत सदैव हंसतमुख प्रसन्न चित्त होतो.

सॉक्रटिस महान ज्ञानी. पण अत्यंत कुरूप. त्याची पत्नि झांथिपि अति सुंदर. तेवढीच कलह-प्रिय. एके दिवशी झांथिपीला तिच्या मैत्रिणीने विचारले, ''तूं अशा कुरूप माणसाशी लग्न कां केलेस?''

झांथिपी म्हणाली, ''माझा पति कुरूप नाही. त्याचा देह कुरूप !''

आत्मज्ञानी पतीला योग्य अशा पत्नीने बोलावे तसे झांथिपि बोलली. ती पुढे म्हणाली,

''तुमच्या पतीचे सौंदर्य एक ना एक दिवस नाहीसे होईल. तेव्हा तुम्ही निराश व्हाल. माझा पति श्रेष्ठ संत. त्याचे हृदय सौंदर्य नित्य-नूतन!''

कांही लोकांनी सॉक्रेटिसला विचारले, 'आपण श्रेष्ठ ज्ञानी. अशा कलह प्रिय स्त्रीशी कां लग्न केले?''

सॉक्रेटिस म्हणाला, ''ती कलह प्रिय आहे; ही गोष्ट खरी पण तिनेच मला आत्मज्ञानी केले''

लोकांना आश्चर्य वाटले त्यांनी विचारले, ''ते कसे?'' सॉक्रेटीस म्हणाला, ''तिने नित्य माझी निंदा केली. त्यामुळे या नश्वर

देहाचा अभिमान कमी झाला. ''अमर सत्यच मी'' हे ज्ञान दृढ झाले''.

अशा रीतीने जगांत स्तुति निंदा, मान-अपमान, श्रीमंती-गरीबी, कांहीही येवो, सत्यदर्शी संत सदा शांत, सदा समाधानी ! अन्यासक्ति सोडून श्रध्दा, सदाचार, समरति यांनी युक्त अशा धर्मपथाचे अनुसरण केलेले अमृत फल. त्यामुळे सत्य-साधक सदा संतोष साम्राज्यांत वास करतो. तोच आनंदयोग !



मनवु घनव नुंगि , घनवु मनव नुंगि
मन घन वेरडनु परब्रह्मवु नुंगिद बळिक
नानेंबु देल्लियदय्या, अखंडेश्वरा

– षण्मुख स्वामि

मनाने गिळले घन, घनाने गिळले मन, मन-घन या दोहोंना परब्रह्माने गिळतां 'मी' चे अस्तित्व कोठे राहिले ? अखंडेश्वरा (घन-पूर्ण)

ननगे नाने गुरूवादेनय्या ! ननगे नाने लिंग वादेनय्या !
ननगे नाने जंगमवादेनय्या ! ननगे नाने प्रसाद वादेनय्या !
ननगे नाने भक्त नादेनय्या ! रेणुक प्रिय नागिनाथनल्लि
आगु होगुनरियय्या नानु !

– बहुरूपी चौडय्या.

माझा गुरु मीच झालो देवा ! माझे लिंग मीच झालो देवा !
माझा जंगम मीच झालो देवा ! माझा प्रसाद मीच झालो देवा !
माझा भक्त मीच झालो देवा ! रेणुक प्रिय नागनाथामध्ये
झाले-गेले ते मी न जाणे देवा !



**पुज्य श्री सिध्देश्वर स्वामीजी**

विजापूरच्या श्री. ज्ञानयोगाश्रमाचे पूज्य 'श्री' बालपणीच भगवंताच्या शोधांत, लिंगैक्य वेदांत केसरी श्री. मल्लिकार्जुन महाशिवयोगी यांचे सन्निधि आले. पू. श्री. मल्लिकार्जुन महाशिवयोगीश्वरांनी, शिवयोग साधने बरोबरच, वेद, आगम, उपनिषदें, योगसूत्र, भगवद्गीता, वचनशास्त्र इत्यादींच्या ज्ञानाचा अमोल ठेवा श्री सिद्धेश्वरांच्या हाती सुपूर्द केला.

तत्वज्ञान विषयांत एम. ए. पदवी संपादन करून श्री सिद्धेश्वर स्वामीजींनी जगतांतील सर्व धर्मग्रंथांचे सखोल अध्ययन केले. सर्व धर्मकेंद्रांचा अभ्यास केला. गांधीवाद, समाजवाद, भांडवलशाही, लोकशाही, राजशाही इत्यादि सामाजिक व राजकीय विचारधाराही अवगत करून घेतल्या.

निसर्गाविषयीं भगवंतायेवढीच श्रद्धा व प्रेम बाळगणारे 'श्री' अत्यंत साधे, निरागस, विनयशील, मधुर स्वभावाचे ! कन्नड, इंग्रजी, मराठी व हिंदी या भाषांचे प्रकांड पंडित असून श्री'नी कन्नड व इंग्रजी भाषेंत अनेक ग्रंथांची रचना केली आहे. अनेक पाश्चात्य देशांमध्ये त्यांची व्याख्याने झाली आहेत. श्री'च्या प्रवचन माधुर्यांत श्रोत्यांना ब्रह्मानंदाचा अनुभव लाभतो.

श्री'च्या अध्यात्म प्रवचनांचे भगवच्चिंतन, मी कोण आहे? भक्तियोग आणि आनंद योग या ग्रंथात संकलन झाले आहे.

शिवशक्ती ऑफसेट प्रिंटर्स इचलकरंजी, फोन (०२३०) ४३९७३९